# नवभारत

डिसेंबर २००७


सरफोजी दुसरा




टॉलेमी



टॉलेमीची व्यवस्था


कोपर्निकसची व्यवस्था

कोपर्निकस



अनुक्रमणिका

















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक ३ । डिसेंबर २००७
कार्तिक/मार्गशीर्ष शके १९२९
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका






# अनुक्रमणिका

# सूर्यकेंद्री ग्रहमाला आणि हिंदुस्थान

श्री० मा० भावे

(अ) ज्ञानेश्वरीच्या चौथ्या अध्यायातील ९९ वी ओवी खालीलप्रमाणे आहे :

आणि उदोअस्ताचेनि प्रमाणे
जैसें न चालता सूर्याचें चालणें।
तैसे नैष्कर्म्यतत्त्व जाणे
कर्मीचें असतां।।९९।।

या ओवीचा आधार घेऊन अनेक अभ्यासक असे सांगतात की, सूर्य स्थिर आहे व पृथ्वी फिरते, हे भारतीयांना प्राचीन काळापासून माहीत होते. आर्यभट हा ज्ञानेश्वरांच्या पूर्वी सहा-सातशे वर्षे होऊन गेला. त्याने सांगितले होते की,

अनुलोमगतिर्नौस्थ: पश्यत्यचलं विलोमगं यद्वत्।
अचलानि भांति तद्वत् समपश्चिमगानि लंकायाम्।।१।।

या श्लोकाचा अर्थ असा की, नावेत बसून (नदीतून) जाणाऱ्या माणसाला काठावरच्या स्थिर वस्तू मागे जाताना आढळतात. त्याचप्रमाणे स्थिर असणारे तारे लंकेतील माणसांना पश्चिमेकडे जाताना दिसतात.

आर्यभटाचा श्लोक आणि ज्ञानेश्वराची ओवी या दोन्हींवरून आपल्याला इतकेच कळते की, भारतीय संस्कृतीला सूर्याची पूर्वेकडून पश्चिमेकडे जाण्याची गती ही पृथ्वीच्या पश्चिमेकडून पूर्वेकडे होणाऱ्या स्वत:भोवताच्या भ्रमणामुळे झालेला दृष्टिभ्रम आहे, हे माहीत होते.

(आ) तथापि, पृथ्वी स्वत:भोवती फिरते व त्यामुळे दिवस-रात्र होतात ही गोष्ट इतर अनेक संस्कृतींना माहीत होती. किंबहुना इ.स.पू. १५० वर्षे या काळात टॉलेमीने 'अल्मागेस्ट' नावाचा खगोलशास्त्रीय ग्रंथ लिहिला. त्यानेही पृथ्वीचे स्वत:शी गिरक्या घेणे हे मान्य केलेच होते. सारांश, पृथ्वीची दैनंदिन गती हा वादाचा मुद्दा इसवी सन सुरू होण्यापूर्वीच निकालात निघाला होता. प्रश्न होता तो सूर्याच्या वार्षिक भ्रमणाचा.

फार पूर्वीपासून लोकांना हे माहीत झाले होते की, आकाशस्थ गोलांपैकी बहुतेक गोल असे आहेत की, त्यांची परस्परसापेक्ष स्थाने बदलत नाहीत. त्यांना 'तारे' असे म्हणतात. उलट काही गोल असे असतात की, या ताऱ्यांच्या सापेक्ष या गोलांची स्थाने बदलतात. अशा फिरत्या गोलांना ग्रह म्हणत. स्थिर ताऱ्यांचे निरनिराळ्या संस्कृतींनी नक्षत्रांत व नक्षत्रांचे राशीत वाटप करून टाकले होते.

सूर्य उगवताना तो कोणत्या राशीत आहे, हे पाहणे शक्य असते. लोकांना हे कळून आले होते की, सूर्य साधारणपणाने ३० दिवसांनी राशी बदलतो व एक वर्षाने संपूर्ण राशिचक्र पार करून मूळ जागी येतो. ही चक्राकार फिरण्याची त्याची दिशा पश्चिमेकडून पूर्वेकडे असते. सूर्याची ही वार्षिक गती हाही दृष्टिभ्रम आहे. वास्तविक सूर्य स्थिर असून पृथ्वी वर्षभरात १२ राशींतून पूर्वेकडून पश्चिमेकडे फिरते व त्यामुळे सूर्य हिंडताना आढळतो, ही कल्पना कोपर्निकसने १५४३ साली मांडली.

(इ) कोपर्निकसच्या मरणानंतर त्याचे 'सूर्यकेंद्री व्यवस्थे'ची कल्पना मांडणारे पुस्तक प्रसिद्ध झाले. परंतु युरोपातील लोकांनीही 'सूर्यकेंद्री व्यवस्था' लागलीच स्वीकारली असे नाही. त्याला दोन कारणे आहेत. पहिले म्हणजे कॅथॉलिक चर्च व प्रॉटेस्टंट पंथ या दोघांनाही 'सूर्यकेंद्री व्यवस्थे'ची कल्पना मान्य नव्हती. कॅथॉलिक चर्च नवीन व्यवस्थेला 'खगोलशास्त्रीय गणिते सोपी करणारा एक अभ्युपगम' (हायपॉथेसिस) इथपर्यंत तरी मान्यता द्यायला तयार होते. पण प्रॉटेस्टंट लोकांचा विरोध जास्त कट्टर होता. युरोपातील शिक्षण तेव्हा चर्च व धर्मगुरू यांच्या ताब्यात होते. त्यामुळे कोपर्निकसची कल्पना आम समाजापर्यंत पोचण्याचा जो अधिकृत मार्ग - म्हणजे शाळातून नवीन उपपत्ती शिकवली जाणे-तो कोपर्निकसच्या व्यवस्थेला उपलब्ध नव्हता.

दुसरी अडचण ही होती की, कोपर्निकसची व्यवस्था मान्य केली तरी ग्रहांच्या स्थितीबद्दल मांडलेली गणिते व प्रत्यक्ष स्थिती यात तफावत राहातच होती. म्हणजे








कोपर्निकसच्या व्यवस्थेमुळे खगोलशास्त्रातील निर्णयांमध्ये अधिक नेमकेपणा आला होता, असे नव्हते. किंबहुना ग्रहगतींच्या गणितासाठी टॉलेमीला ज्या अधिचक्रादी क्लृप्त्या वापराव्या लागल्या होत्या त्या कोपर्निकसच्या उपपत्तीतही अपरिहार्य होऊन बसल्या होत्या. त्यामुळे जे धार्मिक कारणास्तव सूर्यकेंद्री व्यवस्थेला मान्यता नाकारावी अशा मताचे नव्हते, त्यांनाही टॉलेमीची व्यवस्था सोडून कोपर्निकसची व्यवस्था का स्वीकारावी याचे समाधानकारक स्पष्टीकरण देता येत नव्हते.

सूर्यकेंद्री व्यवस्थेला युरोपात मिळालेली मान्यता :-

(अ) सूर्यकेंद्री व्यवस्थेला युरोपात अंतिमतः मान्यता मिळाली कारण सूर्यकेंद्री व्यवस्था स्वीकारणाऱ्यांनी तीवर आधारित खगोलशास्त्रीय उपपत्तीचे पुनःपुन्हा परिष्करण केले आणि सुधारित शास्त्रानुसार केलेली गणिते बरोबर येतात असे दाखवून दिले. 'सूर्यकेंद्री व्यवस्था' एक टूम म्हणून कोपर्निकसपूर्वी ॲरिस्टार्कस् नावाच्या ग्रीकाने इ.स.पू. २०० इतक्या वर्षी मांडलीही होती. तथापि त्या वेळेस ॲरिस्टार्कसला असे अनुयायी मिळाले नाहीत की, ज्यांनी 'सूर्यकेंद्री व्यवस्था' मानून कुठपर्यंत प्रगती करता येते, ते तरी पाहू असा विचार केला.

कोपर्निकसचे हे भाग्य की, त्याला केप्लर (१५७१-१६३०), गॅलिलिओ (१५६४-१६४२) आणि न्यूटन (१६४२-१७२७) असे एकापेक्षा एक बुद्धिमान अनुयायी लाभले व त्यांनी सूर्यकेंद्री व्यवस्था उत्तरोत्तर पूर्णत्वाला नेली. कोपर्निकसने फक्त इतकेच म्हटले होते की, पृथ्वीसकट सर्व ग्रह सूर्याभोवती वर्तुळाकार व समवेगाने फिरतात. या ज्या दोन अटी होत्या – वर्तुळाकार कक्षा व समवेग त्या केप्लरने धुडकावून लावल्या आणि कक्षा लंबगोलाकार असतात व ग्रहांचा वेग बदलत असतो असे सांगणारे दोन नवीन नियम केले. केप्लरचा तिसराही नियम होता, पण त्याच्याशी आपल्याला इथे कर्तव्य नाही.

गॅलिलिओने गतिशास्त्राचा (मेकॅनिक्सचा) पाया घातला आणि ग्रह फिरत का राहातात याविषयीचा जडत्वाचा नियम केला. ग्रह का फिरत राहातात याचे गॅलिलिओने अगदी सोपे उत्तर दिले. त्यांना कोणी थांबवत नाही म्हणून! वस्तूंचे स्थिर असणे जितके स्वाभाविक आहे तितकेच त्यांचे गतिमान असणेही स्वाभाविक आहे.

कोपर्निकस, केप्लर, गॅलिलिओ यांनी ज्या कल्पना मांडल्या होत्या त्यांना एका सूत्रात गोवून एक महासिद्धान्त निर्माण करण्याचे काम न्यूटनने आपल्या प्रिन्सिपिया या अपूर्व ग्रंथात १६८७ साली केले. त्याने आपला गुरुत्वाकर्षणाचा सिद्धान्त मांडला व केप्लरचे नियम त्या सिद्धान्ताचे उपसिद्धान्त होत हे सिद्ध केले. सारांश, १५४२ मध्ये मांडलेली सूर्यकेंदी ग्रहमालेची संकल्पना १६८७ मध्ये गुरुत्वाकर्षणाच्या महासिद्धान्तात विलीन झाली.

(आ) न्यूटनने 'सूर्यकेंद्री व्यवस्था' एका ठाम टप्प्यावर आणून सोडली तरी ती युरोपीय समाजाने स्वीकारली असे म्हणता येणार नाही. न्यूटनच्या महासिद्धान्तावर आक्षेप घेणारे लोकही होते. त्यातील तात्त्विक आक्षेपांना उत्तरे देण्यासाठी कान्टने (१७८१) साली 'क्रिटिक ऑफ प्युअर रीझन' नावाचा ग्रंथ लिहिला. याचा अर्थ असा की, ज्या निःशंकपणे सूर्यकेंद्री ग्रहमाला आज सर्वत्र मान्यता पावली आहे तितक्या निःशंकपणे १७८१ साली देखील ती युरोपात मान्यता पावली नव्हती. मग शाळातून व विद्यापीठातून ती शिकविली जाण्याची गोष्ट लांबच राहिली.

इतके असले तरी, जर्मनीतील साल नदीच्या काठावर 'हाल' नावाचे एक शहर आहे; तेथे एक पाएटिस्ट मिशन ऑगुस्ट हेरमान फ्रान्क (१६६३-१७२७) नावाच्या धर्मगुरूने १७ व्या शतकाच्या अखेरीला स्थापन केले. आजही तो मठ 'फ्रान्क फाऊंडेशन' या नावाने हाल या गावी अस्तित्त्वात आहे. फ्रान्क हा प्रॉटेस्टंट पंथाचा होता व या पंथाचा कोपर्निकसच्या सूर्यकेंद्री व्यवस्थेला धर्माच्या कारणास्तव कडवा विरोध हो[illegible]. परंतु गुरू फ्रान्क हा मोकळ्या मनाचा धर्मगुरू होता त्यामुळे मठाने चालविलेली जी शाळा होती, त्या शाळेत विज्ञानाचे शिक्षण देण्याची त्याने व्यवस्था केली होती.

फ्रान्कने विज्ञानाचा जो अभ्यासक्रम शाळेत सुरू केला होता तो आजदेखील आदर्श म्हणून गणला जावा असा होता. विद्यार्थ्यांनी अनुभवातून विज्ञान व तंत्रज्ञान यांची ओळख करून घ्यावी, असा त्याचा उद्देश








होता. त्यामुळे त्याने मठात एक छापखाना, पुस्तकाचे दुकान व औषधे बनविण्याची प्रयोगशाळा काढली होती. भूमिती शिकताना विद्यार्थ्यांनी कंपास व टेप घेऊन प्रत्यक्ष मोजमापे घ्यावीत, भौतिकी शिकताना प्रयोग करावेत, शरीररचना शिकताना प्रेतांचे छेद घेऊन शरीरातील संस्था पाहाव्यात असा त्याचा आग्रह असे. हालच्या मठात 'कुन्स्ट उण्ड नाचुरालियेन काम्मेर' नावाचे संग्रहालय होते. तेथे वनस्पती, कीटक व जनावरे, नकाशे, ग्रहमाला दाखविणारे गोल (ज्याला आर्मिलरी असे म्हणतात) अशी निरनिराळी उपकरणे ठेवलेली होती. फ्रान्कचे म्हणणे होते की, ईश्वरविषयीची भक्ती प्रगाढ व्हावयाची असेल तर विश्वाचे वैविध्य व त्याच्या सत्तेमागची ईश्वराची योजना लोकांच्या मनात ठसली पाहिजे.

फ्रान्कचा मृत्यू झाल्यानंतर हालच्या मठाचे विद्यापीठात रूपांतर झाल्यावर फ्रॅन्क फाऊंडेशनने विद्यापीठाच्या केंद्रस्थानी एक मोठे संग्रहालय उभारले. या संग्रहालयाच्या मध्यभागी दोन प्रचंड मोठे 'आर्मिलरी' गोल ठेवले होते. एक गोल सूर्यकेंद्री ग्रहमालेचे प्रारूप दाखवीत होता. तर दुसरा गोल पृथ्वीकेंद्री ग्रहमालेचे स्वरूप दाखवीत होता. त्यावरून त्याच्या शाळेत व विद्यापीठात सूर्यकेंद्री ग्रहमालेचा अभ्यास १७३९ सालीच सुरू झाला होता, हे स्पष्ट होते.

ट्रान्कबार येथील प्रॉटेस्टंट ख्रिश्चनांचा मठ :-

(अ) १७ व्या शतकात अनेक युरोपीय देशांनी हिंदुस्थानाशी व्यापार करण्यासाठी कंपन्या स्थापन केल्या. डेन्मार्क या देशानेही अशी एक कंपनी स्थापन केली होती. तंजावरजवळ 'तरंकमपाटी' नावाचे ठिकाण आहे. तेथे या कंपनीने आपली वखार १६२० मध्ये घातली होती व स्वत:ची वसाहत स्थापिली होती. या ठिकाणी एक मठ उभारावा असे डेन्मार्कचा राजा फ्रीडरिश (चौथा) याने ठरविले आणि त्याने झीगेनबाल्ग व प्लूशाऊ नावाचे दोन धर्मगुरू हिंदुस्थानात पाठविले, ते ९ जुलै १७०५ रोजी तरंकमपाटीला पोचले. डेन्मार्कचे लोक तरंकमपाटीला 'ट्रान्कबार' असे म्हणत. हे दोघेही धर्मगुरू हाल येथे फ्रान्कच्या हाताखाली शिकले होते. त्यामुळे वैज्ञानिक संग्रहालय व त्याच्या साहाय्याने विज्ञानाचा अभ्यास या गोष्टी त्यांच्या मनावर पूर्ण बिंबल्या होत्या.

मठाचे मुख्य काम अर्थातच ख्रिस्ती धर्मातील प्रॉटेस्टंट मताचा प्रचार करणे हेच होते. त्यामुळे हा मठ डेन्मार्कने केलेल्या वसाहतीतील हिंदू व मुसलमान यांना ख्रिस्ती करून घेत असेच, पण या भागात राहाणाऱ्या कॅथॉलिक ख्रिश्चनांना प्रॉटेस्टंट करून घेत असे. तंजावर राज्यात १७५३ सालापर्यंत ख्रिश्चन धर्माच्या प्रसाराला बंदी होती. परंतु त्यानंतर फ्रीडरिश श्वार्ट्झ (१७२६-१७९८) याने तंजावर राज्यात ट्रान्कबार येथील मठाच्या शाखा स्थापन केल्या. ट्रान्कबारचा मठ व त्याच्या शाखा यात युरोपीय लोक हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच असत. या मठाचा कारभार एतद्देशीय सहाय्यकांच्या मदतीवरच असे.

मठाचे संस्थापक हाल येथील मठात शिकून तयार झालेले होतेच, पण त्यांच्या नंतरही इथे जे धर्मगुरू आले, ते देखील हालच्या मठातून शिक्षण घेऊन आले होते. ट्रान्कबार येथील मठ हा हिंदुस्थानातील पहिला प्रॉटेस्टंट मठ होता. इंग्लंड हेही प्रॉटेस्टंट पंथीय राष्ट्र होते. तंजावरपासून मद्रास जवळ आहे व मद्रासला इंग्रजांचे बलिष्ठ ठाणे होते. इंग्लंडमधील धर्मसंस्था व हाल येथील मठ यांच्यात मैत्रीचे संबंध होते. अशा विविध कारणांनी ट्रान्कबार येथील मठात व त्याच्या शाखांत वरिष्ठ धर्मगुरू म्हणून हालमधून शिकून आलेल्या उमेदवारांच्या नेमणुका होत.

(आ) अठराव्या शतकात मद्रास येथे इंग्रजांची सामर्थ्यशाली वसाहत होतीच पण तामिळनाडूत ठिकठिकाणी त्यांची ठाणी होती. तिरूचिरापल्ली इथे इंग्रजांचे ठाणे होते. अशा ठाण्यात युरोपीय कुटुंबे तिथल्या मुलांसाठी वसाहतीतून लहानलहान शाळा चालवीत. या शाळांत वापरलेली भाषा इंग्रजीच असे. या शाळांतून शिकविण्यासाठी ट्रान्कबार येथील मठातूनच शिक्षक पाठविले जात. किंबहुना या शाळा ट्रान्कबार येथील मिशनकरवीच चालविल्या जात. हे शिक्षक हाल येथील शाळेत शिकलेले असत आणि मागे सांगितल्याप्रमाणे हाल येथील शाळेत आधुनिक विज्ञान व सूर्यकेंद्री ग्रहमाला यांचे शिक्षण दिले जाई.

अशा रीतीने सूर्यकेंद्री ग्रहमालेची कल्पना ट्रान्कबार मठाद्वारे हिंदुस्थानाच्या भूमीवर पोहोचली, असे म्हणता येईल, पण सूर्यकेंद्री - ग्रहमाला हिंदुस्थानाच्या

जमिनीवर शिकविली जाऊ लागली तरी ती फक्त युरोपियनांनाच शिकविली जात होती. हिंदुस्थानी समाजापर्यंत ती कधी व कशी पोचली, येथील समाजाने ती स्वीकारली किंवा नाही याचा विचार आता केला पाहिजे.

सरफोजी आणि वेदनायकम् शास्त्री :-

(अ) ट्रान्कबार येथील मठात ज्यांनी शिक्षण घेऊन युरोपीय विज्ञान व मुख्यतः सूर्यकेंद्री ग्रहमालेची व्यवस्था आत्मसात केली त्यात वेदनायकम्शास्त्री पिल्ले व तंजावरचा राजा सरफोजी दुसरा, यांची नावे प्रामुख्याने घेतली पाहिजेत. या दोघांनी युरोपीय विज्ञान, भूगोल, खगोल इत्यादी शास्त्रांचे नुसते अध्ययन केले इतकेच नाही, तर तो अभ्यास पुढे चालू ठेवला आणि सामान्य माणसात हे ज्ञान पसरावे यासाठी प्रयत्नही केले. त्याची हकीकत थोडक्यात पाहू.

वेदनायकम् शास्त्री पिल्ले (१७७४-१८६४) हा मूळचा केरळचा रोमन कॅथलिक मनुष्य. रेव्ह. श्वार्ट्झ याने १७८५ साली त्याला तंजावरच्या मठात आणून ठेवले. तेथे त्याने कॅथलिक पंथ सोडला व श्वार्ट्झचा प्रॉटेस्टंट पंथ स्वीकारला. नंतर ट्रान्कबारच्या मठात त्याने धर्मशिक्षणा-बरोबर खगोलशास्त्र, गणित व शरीरशास्त्र यांचा अभ्यास केला. नंतर मठातच एक तामिळ शाळा - धर्मप्रचारक निर्माण करण्यासाठी - चालवली जात असे तीत तो मुख्य शिक्षक झाला. १८२९ पर्यंत तो तिथे होता.

सरफोजी दुसरा (१७७७-१८३२) हा तंजावरच्या तुळजाजी राजे यांचा मुलगा. तो १० वर्षांचा असताना तुळजाजी वारला व तंजावरचे राज्य सरफोजीच्या चुलत्याने बळकावले. तेव्हा सरफोजी रेव्ह. श्वार्ट्झ याच्या आश्रयाला गेला. १७९३ ते १७९७ अशी पाच वर्षे श्वार्ट्झने सरफोजीला ट्रान्कबार मठाने मद्रासला जी शाळा चालवली होती तेथे शिकविले. सरफोजीला तेथे युरोपीय विज्ञान, खगोलशास्त्र इत्यादिकांची गोडी लागली. पुढे १७९८ मध्ये श्वार्ट्झच्या मध्यस्थीमुळे इंग्रजांनी तुळजोजीच्या भावाला राज्यावरून काढून तंजावरच्या गादीवर सरफोजीला बसविले. परंतु १७९८ पासून तंजावर हे इंग्रजांच्या पूर्णपणे ताब्यात गेले.

(आ) वेदनायकम् शास्त्री आणि सरफोजी यांचा युरोपीय विज्ञानाशी आलेला संबंध ट्रान्कबारच्या मठाच्या द्वारे आला. इंग्रजांचे राज्य स्थापन झाल्यावर हिंदुस्थानात ज्या शाळा सरकारने काढल्या तेथे दिले जाणारे विज्ञानाचे क्रमिक पुस्तकी शिक्षण व ट्रान्कबारच्या मठात चालत असणारी शिक्षणपद्धती यात महदंतर होते. इथे शास्त्री व सरफोजी यांनी स्वेच्छेने, सर्व उपकरणांचा वापर करून, वनस्पती व प्राणी यांचे नमुने हाताळीत व युरोपीयन शास्त्रज्ञांच्या मूळ ग्रंथांवरून शिकता येत असल्याने त्याची युरोपीय विज्ञानाशी झालेली मैत्री अधिक फलदायी झाली. आजही सरस्वती महाल येथे सरफोजीने विज्ञानाच्या अभ्यासासाठी वापरलेली पुस्तके, उपकरणी, जमा केलेले नमुने आणि काढलेल्या आकृत्या इत्यादी सामान मांडून ठेवले आहे. ते नीट पाहिले की, आपाणास कळून येते की, इंग्रजी शाळा - महाविद्यालयामधील विद्यार्थी व ते शिकत असलेले विषय यांच्यात जे अनुल्लंघ्य अंतर आजही उरते ते सरफोजी आणि युरोपीय विज्ञान यात राहिले नव्हते. असो.

(इ) पण वेदनायकम् शास्त्री आणि सरफोजी हे युरोपीय विज्ञान केवळ शिकूनच थांबले नाहीत. देशी भाषांतून व लोककथांच्या धाटणीवर कथा रचून त्यांनी ते विज्ञान लोकांपर्यंत पोचविण्याचा प्रयत्न केला. ही, या युरोपीय विज्ञानाच्या भरतीय अवतारातील एक रोचक कहाणी आहे. तूर्त आपण वेदनायकम् शास्त्री याचे वाङ्मय बाजूला ठेवून सरफोजींवर लक्ष केंद्रित करू, नाहीतर निबंध पुष्कळच लांबेल.

तामिळमध्ये करवंजी नावाचा काव्यप्रकार आहे. याची धाटणी अशी असते. कोणी राजघराण्यातील विरहिणी विमनस्क होऊन बसली असताना भटक्या जातीतील स्त्री तिथे येऊन, इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगून तिचे मन रिझवते. सरफोजीने 'देवेंद्र करवंजी' नावाचे काव्य मराठीत लिहिले त्या काव्यात अशी कल्पना केली आहे की, इंद्र कोठे दूर गेला आहे व इंद्रणी झुरत बसली आहे. अशा वेळी एक बुरुडीण तिथे आली आणि ती इंद्राणीला सांगू लागली की, 'मी मेरू पर्वतावरून आले आहे. मी सारे विश्व हिंडून पाहिले आहे.'

तेव्हा इंद्राणी तिला म्हणाली, "मग तर तू सर्वज्ञानी झाली असणार. मला जगातील पर्वत, नद्या, देश यांची माहिती सांग. मला सगळा भूगोल शिकायचा आहे.

मला सांग, पृथ्वी सूर्याभोवती फिरते की, सूर्य पृथ्वीभोवती फिरतो? मला सांग की, चंद्राची कक्षा कशी आहे, कोणते ग्रह सूर्याभोवती फिरतात? पृथ्वीगोलाचा व्यास केवढा आहे?"

त्यावर बुरुडीण सांगते की, 'तुला पुराणातील विश्वरचना माहीत आहे. पण मी तुला आता अगदी वेगळी अशी विश्वरचना सांगते.' मग ती कोपर्निकसने वर्णिलेली ग्रहमालेची रचना सांगते, "एखादी मशाल स्वत:भोवती फिरत राहावी तसा सूर्य स्वत:च्या जागी आणि स्वत:भोवती फिरत असतो. तो दुसऱ्या कोणाभोवती फिरत नाही. उलट पृथ्वी सूर्याभोवती एका वर्षात एक फेरी मारते." त्यानंतर बुरुडीण पृथ्वीवरील देश, नद्या, महत्त्वाची शहरे यांची माहिती देत आहे. ही माहिती गद्य-पद्यात दिली असून पदे राग व ताल यांच्या मांडणीत बसवली आहेत.

(ई) पाश्चात्त्य विज्ञान भारतात येण्याचे विविध मार्ग होते. इंग्रजांचे राज्य इथे स्थापन झाल्यावर त्यांची जी विज्ञानाचा उपयोग करून घेणारी राज्यकारभाराची खाती होती, उदाहरणार्थ, सर्व्हे करणारे खाते, हवामान खाते इत्यादी येथे जी हिंदी माणसे नोकरीस घेत त्यांना प्रशिक्षण देत असत. हिंदी लोकांचा पाश्चात्त्य विज्ञानाशी संबंध आला तो असा नोकरीच्या वाटेने आला. इंग्रजांनी विद्याखाते स्थापन केले. त्याच्या आधीची ही हकीकत आहे. दुसरा मार्ग इंग्रजांनी इथे शाळा काढल्या, त्यासाठी क्रमिक पुस्तके तयार करविली. यातील बहुतेक पुस्तके इंग्रजी क्रमिक पुस्तकांची स्वैर भाषांतरे होती. तिसरा मार्ग म्हणजे येथील उच्चवर्गातील लोकांनी आपल्या अर्थसामर्थ्याचा व आश्रित विद्वानांचा उपयोग करून मिळविलेली पाश्चात्य विज्ञानाची माहिती. जयपूरचा सवाई जयसिंग किंवा झाशीचे शिवरामपंत झाशीवाले अशा संस्थानिकांनी हा उद्योग केला. चौथा मार्ग इंग्रजांनी विद्यापीठांची स्थापना केल्यावर उपलब्ध झाला.

या सगळ्यांपेक्षा अगदी निराळी गोष्ट सरफोजीच्या बाबतीत घडली. काही योगायोगामुळे त्याला हिंदुस्थानातच एका अत्याधुनिक शाळेत उत्कृष्ट अशा युरोपीय शाळेतून शिकून आलेल्या विद्वानांच्या पायाशी बसून पाश्चात्त्य विज्ञान शिकावयाला मिळाले. त्यामुळे विज्ञान हे त्याच्या चिंतनानाच भाग बनून गेले. आयुष्यभर त्याने विज्ञानाचा अभ्यास केला व समाजातही त्याचा प्रसार केला.

संदर्भ :-

१) Heike Libau : Country Priest ... in the content of Tranquebar Mission.

Frykenber of Robert (Ed): Christions and Missionaries in India. Proutlege Curzon. London (२००३) या पुस्तकात आहे.

२) हा लेख 'भारत इतिहास संशोधक मंडळा'च्या 'त्रैमासिक' या शोध-नियतकालिकाच्या ८३ व्या खंडात प्रसिद्ध झाला आहे.

✠✠✠



अनुक्रमणिका

# एकोणिसावे शतक आणि महाराष्ट्रातील धर्मविषयक विचार

प्रा० सोपान शेंडे

प्रास्ताविक -

जगाच्या इतिहासात कोणत्याही कालखंडाचा विचार केला तरी त्यात धर्माला महत्त्वपूर्ण स्थान असलेले दिसून येते. तत्कालीन सामाजिक, राजकीय व आर्थिक जीवनावर धर्माचा परिणाम झाल्याचे दिसून येते. त्याला एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र अपवाद ठरत नाही. वसाहतवादाच्या प्रभावामुळे महाराष्ट्रात नवे विचार व कल्पना यांच्या माध्यमातून आधुनिकतेला प्रारंभ झाला होता. अशा वेळी महाराष्ट्राच्या धार्मिक जीवनात ख्रिश्चन धर्माने प्रवेश करून जे वर्चस्व प्रस्थापित केले त्याचे महाराष्ट्राच्या इतिहासावर दूरगामी परिणाम झालेले दिसून येतात. त्याचा अतिशय ढोबळमानाने आढावा घेण्याचा प्रयत्न या लेखाद्वारे केलेला आहे.

एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राच्या धर्मविषयक विचारांचा मागोवा घेताना प्रामुख्याने पेशवेकालीन महाराष्ट्रातील धर्माचे स्वरूप, ख्रिश्चन धर्म प्रसार आणि त्याचे स्वरूप, ख्रिस्ती मिशनरी आणि इंग्रज सरकार यांचे संबंध, मिशनऱ्यांच्या धर्मप्रसाराला महाराष्ट्रातून झालेला विरोध आणि विरोधाचे स्वरूप व ख्रिस्ती धर्म प्रसाराचे महाराष्ट्राच्या सामाजिक व धार्मिक जीवन व विचारांवर झालेले परिणाम इत्यादी मुद्द्यांचा विचार केलेला आहे.

पेशवेकालीन धार्मिक परिस्थिती :

पेशवेकालीन महाराष्ट्रात हिंदू धर्म हा एक महत्त्वाचा व बहुसंख्यांचा धर्म होता. याशिवाय इस्लाम, पारशी, शीख, ख्रिश्चन या धर्मांचा ही समावेश होता. राज्यकर्त्यांचा धर्म म्हणून हिंदू धर्माला विशेष महत्त्व प्राप्त झालेले होते. या काळातील हिंदू धर्माला सगुणोपासना, देवदेवता, स्नान संध्या, व्रत-वैकल्ये, यज्ञयाग, नवस-अनुष्ठाने, पाप-पुण्य, स्वर्ग-नरक इत्यादींना महत्त्व देणाऱ्या पुरोहित वर्चस्ववादी ब्राह्मणी धर्माचे स्वरूप प्राप्त झाले होते.

या धार्मिक जीवनाचा तत्कालीन समाज जीवन, लोकव्यवहार, आचार व विचार यावर मोठ्या प्रमाणात प्रभाव पडल्याचे दिसून येते.

एकोणिसाव्या शतकातील धर्मविषयक विचारांचा आढावा घेताना ही पार्श्वभूमी विचारात घेणे आवश्यक ठरते. त्यातून आपणाला महाराष्ट्रातील माणसाची जाणीव होते.

ख्रिश्चन धर्म प्रसार आणि त्याचे स्वरूप :

महाराष्ट्रातील ख्रिश्चन धर्म प्रसाराचा विचार करताना त्याचे प्रामुख्याने दोन भाग करावे लागतात. १) पोर्तुगिजांचा धर्म प्रसार, त्याचे स्वरूप आणि परिणाम २) प्रोटेस्टंट पंथीयांचा धर्म प्रसार आणि त्याचे स्वरूप.

१९ व्या शतकाचा विचार करताना महाराष्ट्राच्या संदर्भात आपणाला प्रोटेस्टंट पंथाचा विचार करावा लागतो. इ.स. १८१५ ते १८५० हा मिशनरी लोकांच्या ऐन कर्तबगारीचा कालखंड मानला जातो. इ.स. १८०७ मध्ये डॉ. टेलर नावाचा एक मिशनरी मुंबई बेटात उतरला. परंतु त्याला सरकारने धर्म प्रसाराची परवानी नाकारली. इ.स. १८१२ मध्ये जड्सन हॉल व नॉट् यांनी कलकत्त्याला जाऊन धर्म प्रसाराचे प्रयत्न केले. परंतु बंगाल सरकारने त्यांना हाकलून लावले. त्यानंतर जड्सन ब्रह्मदेशात अबी हॉल व नॉट् मुंबईत आले. त्यावेळी सर एव्हन नेपियन — मुंबईचा गर्व्हनर होता. त्याने मिशनऱ्यांना सुरूवातीला विरोध केला पण नंतर परवानगी दिली. इ.स.१८१५ मध्ये लंडन मिशनरी सोसायटीने सुरत आणि बेळगाव येथे मिशन स्थापण्याचा प्रयत्न केला. १८२० मध्ये चर्च मिशनरी सोसायटीने कोकणपट्टीत आपले कार्य सुरू केले. १८२२ मध्ये स्कॉटीश मिशनरी सोसायटीने डॉनल्ड मिचेल यास आपला प्रतिनिधी म्हणून मुंबईला पाठविले. इ.स. १८२० ते १८४० या काळात चर्च ऑफ स्कॉटलँड मार्फत जे मिशनरी हिंदुस्थानात आले, त्यापैकी रॉबर्ट नेस्बिट (१८२७), रेव्ह. जॉन विल्सन (१८२९) व रेव्ह मरे-मिचेल






(१८३८) यांची नावे फार गाजली. महाराष्ट्रात इंग्रजी अंमल सुरू होण्यापूर्वीच १८१३ मध्ये ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी मुंबईत 'मुंबई बायबल सोसायटी व अमेरिकन मराठा मिशन' ह्या दोन संस्था स्थापन केल्या होत्या. महाराष्ट्रातील ख्रिश्चन धर्म प्रसारासाठी मिशनने अतोनात यातना सहन करून, छळ सहन करून, लोकभाषा, लोकव्यवहार यांचा अभ्यास करून बाणकोट, पुणे, नगर, नाशिक, जुन्नर, सातारा, शिरूर इत्यादी ठिकाणी प्रचार केंद्रे उघडून उच्च वर्णियांनी उपेक्षिलेल्या लोकांसाठी कार्य सुरू केले.

ख्रिस्ती मिशनऱ्यांनी प्रामुख्याने खेडोपाडी मुलामुलींच्या शाळा सुरू केल्या व महाराष्ट्रात शिक्षणाची द्वारे बहुजनांसाठी खुली केली. रोगग्रस्तांना मोफत औषधे पुरविण्याची व्यवस्था केली. ज्या ज्या ठिकाणी लोक गोळा होण्याची शक्यता असेल तेथे तेथे जाऊन लोकांची विचारपूस करून त्यांच्या अडचणी समजावून घेण्याचे प्रयत्न केले व त्यांना मदत करण्याचे प्रयत्न केले. वसतीगृहे, अनाथालये, दवाखाने सुरू केले. छोट्या उद्योगांना चालना दिली. त्यामुळे हिंदू समाजाच्या खालच्या स्तरातील लोक त्यांच्याकडे आकर्षिले गेले.

मिशनऱ्यांच्या ज्या कार्यामुळे महाराष्ट्राच्या धार्मिक व सामाजिक जीवनात खळबळ निर्माण झाली, समाजजीवन ढवळून निघाले व महाराष्ट्र खऱ्या अर्थाने आधुनिकतेची वाट चालू लागला, ते कार्य म्हणजे शिक्षणविषयक कार्य होय.

<u>शिक्षण विषयक कार्य</u> :

१८१३ ते १८१८ या काळात मिशनऱ्यांनी मुंबईत खेतवाडी व गिरगांव या भागात मराठी लोकांसाठी शाळा सुरू केल्या. १८२४ मध्ये मुलींची एक शाळा सुरू केली. १८२९ पर्यंत त्यांनी मुलींसाठी नऊ शाळा सुरू केल्या. त्यात सुमारे ४०० मुली शिकत होत्या. १९२८ मध्ये डॉ. विल्सन यांच्या पत्नीने तीन शाळा मुंबईत सुरू केल्या. २९ मार्च १८३२ रोजी स्कॉटिश मिशनचाच एक भाग म्हणून विल्सनने 'अंब्रोळी इंग्लिश स्कूल' नावाची शाळा सुरू केली. पुढे तिचेच रूपांतर 'जनरल असेंब्ली इन्स्टीट्यूशन' मध्ये करण्यात आले. पहिल्याच वर्षी शाळेत ४१८ विद्यार्थी होते. त्यात ४१५ हिंदू आणि ३ पार्शी होते. १८३६ मध्ये या शाळेत ५५ मुली होत्या.

या शाळेत ख्रिस्ती धर्मावर पहिल्यापासून भर दिलेला होता. विद्यार्थ्यांना शिक्षणाकडे आकर्षित करण्यासाठी १६ शिष्यवृत्त्या सुरू केल्या होत्या.

हिंदी लोकांना शिक्षण देऊन, त्यांना ख्रिस्ती धर्मातील समता, बंधूभाव, दया इत्यादी तत्त्वांची महती पटवून देऊन शिकलेल्या लोकांचे ख्रिस्तीकरण करणे हे मिशनऱ्यांचे सुत्र होते. त्यांच्या या धोरणातून जी धर्मांतरे झाली त्यातील काही वादग्रस्त प्रकरणातून महाराष्ट्राच्या धार्मिक व सामाजिक जीवनात वादळे निर्माण झाली. त्यातून जे विचार मंथन झाले ते महाराष्ट्राला आधुनिकतेच्या मार्गावर घेवून आले.

अशिक्षितांना सेवावृत्तीने जिंकावे व सुशिक्षितांना युक्तीवादाने कुंठीत करावे असे ख्रिस्ती धर्मोपदेशकांचे दुहेरी मार्ग होते. हिंदूधर्म व समाजरचना यातील वैगुण्यावर त्यांनी एकतर्फी झोड उठविली व ख्रिस्ती धर्माचा महिमा पटवून दिला. त्यामुळे उच्च वर्णीयातील विष्णु भास्कर करमरकर, रामकृष्ण विनायक मोडक, नारायण शेषाद्री, बाबा पदमनजी इत्यादींनी उघडपणे ख्रिश्चन धर्म स्विकारला.

<u>धर्मांतर</u> : स्कॉटिश मिशन मार्फत कोकणात पहिले धर्मांतर इ.स. १८२३ साली झाल्याची नोंद आहे. १८२९ साली रामचंद्र नावाचा एक ब्राह्मण बाणकोट येथे ख्रिस्ती झाला. १८३१ साली विल्सनने आपल्या घरी पाच जणांना बाप्तिस्मा दिला. १८२९ मध्ये मुंबईत नारायण शेणवी ख्रिस्ती झाला.

१७ सप्टेंबर १८२८ च्या बाँबे गॅझेट मध्ये 'सोसायटी इन इंडिया' या लेखात धर्मांतराविषयीचा उल्लेख महत्त्वाचा वाटतो ..."गेल्या दहा वर्षात हिंदूस्थानात खऱ्या धर्मांतराची (उच्चवर्णीयांची) दहा देखील उदाहरणे घडली नाहीत." ... १८३५ मध्ये सेंट्रल कॉलेज मधील तीन पार्शी तरुणांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याची इच्छा व्यक्त केली.

१८३९ मध्ये दोघांचा बाप्तिस्मा झाला व एकाच्याबाबत विल्सनवर कोर्टात खटला दाखल करण्यात आला.

<u>प्रतिक्रिया</u> : धर्मांतराच्या या प्रकरणाच्या










विरोधात पार्शी समाजाने मोठा विरोध केला. पार्शी, मुस्लीम, हिंदू यांनी एकत्रित विरोध नोंदविला.

१८४३ मध्ये नारायण शेषाद्री यांचे झालेले धर्मांतर व त्याचा भाऊ श्रीपती याच्या शुद्धीकरणावरून महाराष्ट्रात निर्माण झालेला वाद वादळी ठरला.

<u>ख्रिस्ती मिशनरी आणि इंग्रज सरकार संबंध</u> :

हिंदुस्थानातील इंग्रज राजवट आणि धर्मप्रसारासाठी आलेले मिशनरी हे दोघेही ख्रिश्चन असले तरी हिंदूस्थानातील धार्मिक व सामाजिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर मिशनरी आणि इंग्रज राज्यकर्ते यांच्यातील संबंध हे चिंतनीय ठरतात. याबाबत राज्यकर्त्यांची कृती, विचारसरणी व निर्णय आपले राज्य टिकविण्याच्या दृष्टीने अतिशय सावध व स्थानिक धार्मिक बाबतीत ढवळाढवळ न करण्याचे दिसून येतात. याबाबत एल्फिनस्टनचे मत अतिशय बोलके आहे. "ब्राह्मणी राज्य जिंकून इंग्रजांनी सत्ता प्राप्त करून घेतली होती अशा स्थितीत मिशनऱ्यांना उत्तेजन देणे व त्यांची मदत घेणे फार धोक्याचे ठरले असते." (शिक्षणाविषयी विचार करताना) २५ एप्रिल १८४८ मध्ये सर अर्स्किन पेरी याने मुंबईतील एल्फिनस्टन इन्स्टिट्यूटमध्ये जे भाषण केले त्यात तो असे म्हणतो की, "ब्राह्मणाची जात ही अत्यंत सुसंघटित आणि कमालीची वैशिष्ट्यपूर्ण आहे. ......हिंदुस्थानात सार्वत्रिक शिक्षणाचे धोरण जर यशस्वी व्हायचे असेल तर ब्राह्मण वर्गाचे हित त्यात सामावले असले पाहिजे."

तत्पूर्वी १० फेब्रु. १८१८ रोजी जन. स्मिथ याने सातत्याने सातारा पॉक्लमेशन जाहीर केल्यानंतर, शनिवार वाड्यावर इंग्रजांचे निशाण चढल्यानंतर एल्फिनस्टनने पुणे, वाई, वेळे येथे ब्राह्मणांना बोलावून त्यांना वस्त्र, दक्षिणा देवून त्यांचा सत्कार केला व तो ब्राह्मणांनी स्वीकारला.

बॉंबे कुरियर या वृत्तपत्राने या दक्षिणा समारंभाचे वर्णन करताना "एल्फिनस्टनने पुण्याला जो दक्षिणा समारंभ घडवून आणला त्याला उपस्थित राहून व दक्षिणा स्वीकारून शास्त्री पंडितांनी इंग्रजी अंमलास आपली मान्यता दिली. हा समारंभ म्हणजे लोकमत इंग्रजी अंमलाला अनुकूल करून घेण्याच्या बाबतीतील महत्त्वाचा टप्पा आहे."

हिंदुस्थानात ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्याबाबत १८१३ साली ब्रिटिश पार्लमेंटमध्ये जी चर्चा झाली त्यात मोठ्या प्रमाणात ख्रिश्चन धर्मप्रचाराला विरोध झाला. (याबाबतची हकीकत जॉन मार्शमन यांनी दिलेली आहे.) विचार मंथनानंतर १८१३ च्या सनदेत मिशनऱ्याबाबतच्या कलमाला ५४ मते पडली. ३२ मते विरोधात गेली. केवळ २२ मतांनी मिशनऱ्यांना ख्रिस्ती धर्म प्रसार करण्यासाठी सरकारी परवाना मिळाला.

<u>मिशनऱ्यांच्या धर्म प्रसाराला विरोध</u> :

हिंदुस्थानातील ख्रिस्ती धर्म प्रसाराला विरोध करताना हिंदू म्हणून संपूर्ण समाजाचा एकत्रितपणे विचार न करता ब्राह्मण (उच्चवर्णीय) व ब्राह्मणेतर असा भेद केला गेला. ब्राह्मणांचे धर्मांतर व शुद्धीकरण प्रक्रिया या वरून मोठे वादळ निर्माण झाले. ब्राह्मणांमध्ये पुरोगामी व सनातनी असे गट निर्माण झाले. भ्रष्ट झालेल्यांना पुन्हा जातीत घ्यायचे नाही अशी कठोर भूमिका घेतली गेली. ज्यांनी सौम्यभूमिका घेतली त्यांच्यावरही बहिष्काराचे शस्त्रे चालविले गेले. यामागे ख्रिश्चन धर्माचा प्रसार झाल्यास आपल्या धार्मिक व सामाजिक वर्चस्वाला सुरूंग लागेल ही भीती होती, त्यामुळे वादविवाद, चर्चा, वृत्तपत्रांतून मतप्रदर्शने, ग्रंथलेखन, बहिष्काराचे शस्त्र इत्यादींचा अवलंब केला गेला. याबाबत विष्णुबुवा ब्रह्मचारी व त्यांचे समकालीन यांच्या कार्याचा विचार करता येईल.

<u>मिशनऱ्यांच्या धर्मप्रसाराचे परिणाम</u> : या धर्मप्रसारामुळे देशात धर्म व समाज सुधारणा चळवळीस प्रारंभ झाला. त्यासाठी अनेक संस्था, सभा, मंडळे स्थापन झाली. मतप्रदर्शनासाठी लेखन झाले. ब्राह्मणेतरांच्या शिक्षणास प्रारंभ झाला. ब्राह्मण आणि अब्राह्मण असा संघर्ष सुरू झाला. स्वधर्म चिकित्सा व आत्मपरीक्षणास प्रारंभ झाला.

✠✠✠

# युजिन ओनिल ह्या अमेरिकन नाटककाराचे आधुनिक शोकात्मिकेला योगदान

डॉ० अ० पां० दाणी

डॉ. स. रा. गाडगीळ ह्यांच्या शोकात्म विश्वरूप दर्शन (जीवन आणि साहित्य) (राजहंस प्रकाशन, पुणे २०००) ह्या ग्रंथात विसाव्या शतकातील आधुनिक शोकनाट्यांचा सविस्तर ऊहापोह केलेला नाही. एकोणिसाव्या शतकातील इबसेनच्या समस्याप्रधान शोकनाट्याची विस्तृत मीमांसा केल्यानंतर विसाव्या शतकातील शोकनाट्यकर्ते स्ट्रींडबर्ग, इलियट, युजिन ओनिल, सार्त्र, काम्यू ह्यांचा केवळ त्रोटक उल्लेख केलेला आहे. सार्त्र, काम्यू ह्यांच्या शोकात्मिकांवर परात्मतावाद (Existentialism) आणि विरूपतावाद (Absurdism) तसेच तुच्छतावाद (Cynicism) शून्यवाद (Nihilism) ह्यांच्या प्रभावांचा केवळ निर्देश झाला आहे. इब्सेनच्याच शोकात्मिकेचे विवेचन करण्याची मर्यादा डॉ. गाडगीळांनी ठरविली असल्याने आधुनिक शोकनाट्यांची विविध आविष्काररूपे प्रस्तुत ग्रंथात आलेली नाहीत. ह्या शोकनाट्य आविष्कारांमध्ये युजिन ओनिल ह्या अमेरिकन शोकनाट्यकर्त्याने केलेले ग्रीक शोकनाट्याचे आधुनिक पुनरुज्जीवन विशेष लक्षणीय आहे. त्याची चर्चा प्रस्तुत लेखात केलेली आहे.

(२)

युजिन ओनिल (१८८८ - १९५३) ह्या अमेरिकन नाटककाराला १९३६ मध्ये साहित्याचे नोबेल पारितोषिक प्राप्त झाले. नाट्याच्या आकृतिबन्धात आणि तंत्राविष्कारात निर्भयपणे नाविन्यपूर्ण प्रयोग करणाऱ्या ह्या नाटककाराच्या नाटकांचे प्रयोग स्टॉकहोम, बर्लिन, मास्को, पॅरीस, लंडन, डब्लिन इत्यादी पाश्चात्त्य देशांच्या सांस्कृतिक चळवळींची केन्द्रे असणाऱ्या शहरात झाले. दि एम्परर जोन्स, द हेअरी एप, डिझायर अण्डर दि एल्म्स, द ग्रेट गॉड ब्राउन, स्ट्रेंज इण्टरल्यूड, मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्रा, (त्रिनाट्य) दि आइसमन कमेथ, लॉंग डेर्ज् जर्नी इण्टू नाईट इत्यादी प्रथितयश कलाकृतींचा समावेश त्या नाट्यप्रयोगांत होता. मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्रा (१९३१) या नाट्यकृतीने ओनिलची समर्थ अमेरिकन नाटककार ही प्रतिमा अमेरिका व युरोपमध्ये साकार केली व त्याला नोबेल पारितोषिक मिळवून दिले. ओनिलच्या नाट्यकृतीत स्ट्रिंडबर्ग, ह्या स्विडीश नाटककाराचा, शोपेनहावर ह्या मानसशास्त्रज्ञाचा प्रभाव दिसतो. स्ट्रिंडबर्गच्या वास्तववाद व यथातथ्यवाद (Naturalism) यांचा प्रभाव असलेल्या नाटकातील विविध विषय, लैंगिक समस्या संघर्षाचे सखोल परिशीलन, अबोध मनातील विचार प्रक्रियांचे नाट्यदर्शन इत्यादींच्या प्रतीकात्मक आविष्काराने ओनिल प्रभावित झाला होता. फ्राईडच्या मनोविश्लेषण सिद्धान्तांना नाट्यरूप देताना अहम् (ego) आणि इदम् किंवा जीवनदायी लैंगिक प्रेरणा (Id) ह्यांचा तणाव म्हणजेच अनुक्रमे मरण आणि जनन ह्यांच्या संघर्षामध्ये ओनिलला आपली नाट्यबीजे गवसली. हा संघर्ष कधी नियतीच्या उपरोधात (irony) तर कधी शोक नाट्याच्या स्वरूपात (tragedy) आविष्कृत झाला. शोपेनहावरच्या मते मानवी अस्तित्त्वाच्या संघर्ष-वेदनांचे अत्युत्कट स्वरूप दाखविणारा आणि मानवी प्रयत्नांची विफलता दर्शविणारा सर्वोत्कृष्ट नाट्याविष्कार शोकात्मिका होय. ह्या शोकात्मिकेचा परिपाक मनुष्याच्या जीवन संघर्षाच्या अर्थहीनतेच्या जाणीवेत होतो. परंतु सकारात्मक जीवनाचे योगदान मानवी प्रेमभावनेत अर्थपूर्ण प्रतीत होते. ह्या द्वंद्वाची उपरोधात्मक शोकात्मिकता लक्षणीय असून ओनिलला ती कलाविष्कारासाठी आव्हानात्मक वाटली.

ओनिलच्या शोकात्मिकेच्या संकल्पनेवर ग्रीकांच्या शोकात्मिकेच्या संकल्पनेचा प्रभाव आहे. शोकात्मिका फक्त निराशावादी विमनस्कता आणि अर्थहीनता व्यक्त करीत नाही. ग्रीक संस्कृतीच्या मते ती भावनिक, आत्मिक आणि आध्यात्मिक उन्नयन घडवून आणते. जीवनाचा गूढार्थ उकलून दाखवते व समरसता वाढवते. ऐहिक जगातील रागलोभापासून मुक्ती देते. जीवनातील अपूर्ण आशा आकांक्षांना कलाविष्कारात










उदात्त व शाश्वत रूप प्रदान करते. व्यक्तीला ऐहिक स्वप्नपूर्तीच्या पराजयाकडे नेणारा संघर्ष नैतिक व आधिभौतिक स्तरावर त्याच्या जीवनाला सखोल अर्थपूर्णता देतो. प्रतिकूल परिस्थितीशी अन्तर्बाह्य झगडताना लौकिक अपयशाच्या पलीकडे चिरंतन व उदात्त जीवनमूल्यांची पारलौकिक यशप्राप्ती करून देतो. १९२५ साली ओनिलने आपला मित्र आर्थर हॉब्सन क्वीन ह्याला लिहिलेल्या पत्रात स्वतःच्या कलानिर्मितीचा उद्देश स्पष्ट केला आहे. ओनिलच्या मते ग्रीक संकल्पनेप्रमाणे आमूल स्वरूपान्तर घडवून आणणारी उत्तुंग उदात्तता शोकात्मिकेमध्ये अनुभविली पाहिजे. अत्यंत नीच व क्रूर भासणाऱ्या लोकांना विनाशाप्रत नेणाऱ्या नियती व दैवी कोप यांचा प्रभाव आणि आनुवंशिक घटनांचा आणि वृत्तींचा परिपाक ह्यांच्या शृंखलातून मुक्तता मिळणे हे शोकात्मिकेत घडते. ही एक अनाकलनीय प्रक्रिया आहे. मानवाच्या ह्या आत्मविनाशात्मक संघर्षामध्ये इतर प्राणिमात्रांप्रमाणे आत्मप्रकटीकरणाला विराम न देता नियतीशी व प्रतिकूल परिस्थितीशी झुंज देत देत सत्याचा व आत्मशोधाचा आविष्कार करण्याची धडपड करणे ह्यात मानवाची अमरता आहे. ती प्रकट करण्यात शोकात्मिकेचे वैशिष्ट्य व श्रेष्ठत्व सामावले आहे व ह्याची अभिव्यक्ती हा शाश्वत कलाकृतीचा हेतू असला पाहिजे असे ओनिलचे निश्चित मत होते. आधुनिक नाट्यकृतींच्या नूतन मूल्यांमध्ये आणि प्रतिकात्मक आविष्कारांमध्येही प्रेक्षकांना आपले उदात्त व शुभ्र सत्त्व प्रतीत होणे शोकात्मिकेतील पात्रांच्या द्वारे शक्य होईल असा ओनिलचा दृढ विश्वास होता. १९२२ मध्ये एका मुलाखतीत ओनिलने स्वतःच्या कलाकृती विषयी मनोगत व्यक्त केले आहे. रंगमंच हे जीवनाचे सत्त्व आविष्कृत करणारे व जीवनाचा अर्थ व्यक्त करणारे माध्यम आहे. जीवन संघर्ष बऱ्याच प्रसंगी अयशस्वी ठरतो कारण आपल्या आशाआकांक्षांना व स्वप्नांना फलद्रूप होऊ न देणाऱ्या काही विरोधी शक्ती आपल्यातच कार्यरत असतात. इच्छापूर्तीसाठी संघर्ष सुरू झाल्यावर साध्यधेयाच्या पलीकडे आपले मन अदृष्टाकडे सतत धावते हीच मानवी अवस्था शोकात्मिकेला किंवा विरूपतावादी (Absurdist) कलाकृतीला जन्म देते. शोकात्मिकेमध्ये जीवनातील सत्याचे आणि शाश्वत सौंदर्याचे दर्शन होते; जीवनाचा अर्थ आणि सामर्थ्य प्रतीत होते. नीत्शे प्रमाणे ओनिललाही असे वाटत होते की शोकात्मिका जीवनाचे सातत्य व्यक्त करते. त्यामधील पात्रांच्या वेदना आणि यातना, मानवी जीवनाचा भयावह विनाश घडविणारी नृशंस नियती व ह्या सर्वांचा परिणाम स्वरूप आलेली विमनस्कता, कारुण्यभावना व निराशा यांना दूर करणारी आधिभौतिक आत्मिक शक्ती जीवनाच्या समर्थ आणि आनंद पर्यवसायी अमरत्वावरील श्रद्धा कलाकृती द्वारा दृढ करते. कलाकृती मानवी जीवनाला अमरत्व प्रदान करते. प्रतिकूल नियतीशी व परिस्थितीशी झगडणाऱ्या आणि लौकिकदृष्ट्या पराजित होणाऱ्या मानवाला अलौकिक आत्मिक विजय मिळतो ही शोकात्मिकेतील दुर्दैवी व्यक्तीची महानता होय कारण ह्या व्यक्तीवर आनुवंशिक आणि सामाजिक परिस्थितीचा प्रचंड दबाव असतो आणि प्रस्थापित समाजाची आणि मध्यम वर्गीय मवाळ व तटस्थ वृत्ती त्यांना मान्य होऊ शकत नाही. ओनिलच्या शोकात्मिकांचे नायक मध्यमवर्गीय तथाकथित नीतिमूल्यांच्या विरोधी पवित्रा घेतल्यामुळे लौकिकदृष्ट्या अयशस्वी व दुःखी होतात परंतु जीवनाचा अर्थ शोधण्याच्या प्रक्रियेत आत्मज्ञान प्राप्त करून घेतात. ज्या व्यक्ती प्रस्थापित मूल्य स्वीकारतात व संघर्ष टाळतात त्यांची दयनीय अवस्था होते.

डिझायन अण्डर दि एल्मस् (१९२४) आणि मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्रा (१९३२) ही ओनिलची आधुनिक शोकनाट्ये ग्रीक अभिजात शोकनाट्याच्या नियततावादी (Deterministic) आविष्कारावर आधारित आहेत. परंतु त्याच्या शोकनाट्यांच्या व्यक्तिरेखा नियततेशी संघर्ष करीत पूर्व नियोजित प्राक्तनाचा साचा बदलण्याचा प्रयत्न करतात, हे त्याच्या आधुनिक शोकनाट्यांचे वैशिष्ट्य होय. ग्रीक शोकनाट्याच्या आकृतीब ाचा सुधारित आविष्कार डिझायर अण्डर दि एल्मस् पेक्षा मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्रा मध्ये आधिक परिणामकारक झालेला दिसतो. ग्रीक शोकनाट्याच्या संविधानकाला आधुनिक पार्श्वभूमी देऊन रूपांतरित करण्याचा मनोदय ओनिलने १९२६ पासूनच व्यक्त केला होता. अमेरिकेच्या उत्तरपूर्व राज्यातील न्यू इंग्लंड प्रदेशाच्या आणि अमेरिकन यादवी युद्धाच्या पार्श्वभूमीच्या मंचावर इस्किलसच्या ओरेस्टिअन

त्रिनाट्याचा आधुनिक आविष्कार १९३१ मध्ये मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्राच्या रूपाने साकार झाला. मानवाचे जीवन हे सर्वसाक्षी व सर्वव्याप्त महाकाल मृत्यूने व्यापलेले आहे ह्या नियतीवादाच्या प्रभावाने भारलेला ओनिल ग्रीक नाटककारांप्रमाणेच समाजातील अस्थैर्य आणि आध्यात्मिक मन:शान्तीचा शोध यांचे चित्रण करू पाहत होता. ग्रीक शोकनाट्यात नियती व दैवी प्रकोप यांनी घडवून आणलेल्या मानवाच्या यातना आणि त्याचा विनाश, तसेच त्याला स्वत:च्या अपराधामुळे भोगावे लागणारे शासन व त्यानंतर त्या शापित व्यक्तीला प्राप्त झालेले जीवनविषयक आत्मज्ञान मिळणे असा शोकात्मिकेचा आकृतिबंध दिसतो. ओनिलच्या शोकनाट्यात मात्र दैवी संकल्पा ऐवजी घराण्याचे आनुवंशिक अतीत तसेच पात्रांच्या आन्तरिक प्रेरणा, उर्जा, वासना आणि गंड यांचा प्रभाव दिसतो. ह्या प्रक्रियेला आधुनिक नामाभिधान नियतत्तावाद (Determinism) होय. पात्रांचा अपराध आणि त्यांना होणारे शासन यांचा अंतर्भाव ह्या प्रक्रियेत असला तरी यातनामुक्ती व आत्मज्ञान ही पात्रे अनुभवत नाहीत. त्यांना केवळ वैयक्तिक किंवा कौटुंबिक उत्तरदायित्वाची जाणीव होते हा ओनिलच्या ग्रीकशोकनाट्याच्या आधुनिक आविष्काराचा उल्लेखनीय पैलू आहे.

(३)

इस्किलसच्या ओरेस्टिअन त्रिनाट्याचे आधुनिक रूप सादर करताना ओनिलने सोफोक्लिज् युरिपिडीज् तसेच ह्युगोफॉन हाफमनस्थाल (१८७४ – १९२९) ह्या आधुनिक ऑस्ट्रियन नाटककारांनी केलेल्या इलेक्ट्राच्या व्यक्तिचित्रणांचा अभ्यास केलेला दिसतो. विशेषत: लव्हिनिया ह्या आधुनिक इलेक्ट्राचे व्यक्तिमत्व घडवताना ओनिलने इस्किलसच्या ओरेस्टिअन त्रिनाट्याचा, सोफोक्लिजच्या इलेक्ट्राचा युरिपिडीजच्या इलेक्ट्राचा आणि हाफमनस्थाल ह्याच्या इलेक्ट्राचा विचार केलेला दिसतो. ह्या पूर्वसूरींच्या नाट्यकृतीत असलेली इलेक्ट्रा ओनिलच्या आधुनिक इलेक्ट्रापेक्षा (लव्हिनिया ह्या मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्रा ह्या त्रिनाट्यातील पात्रापेक्षा) भिन्न आहे. त्यांचा तौलनिक विचार करण्याकरिता संबंधित ग्रीक शोकनाट्ये आणि ओनिलचे त्रिनाट्य ह्यांची सविस्तर मीमांसा करणे आवश्यक आहे.

ॲट्रिअसच्या शापित घराण्याची कथा होमर, पिंडर, इस्किलस, सोफोक्लिज्, युरिपिडीज् इ. लेखकांनी आपल्या कलाकृतीत सांगितली आहे. ॲगामेम्नन ह्या प्रख्यात ग्रीक योध्याच्या पित्याने – ॲट्रिअसने – आपल्या भावाला — थिएस्टिसला — आपल्या पुतण्यांना मारून त्यांचे मांस जेवणात दिले. ते इगिस्थसचे भाऊ होते. इगिस्थस हा थिएस्टिसचा पुत्र होता. ॲगामेम्नन हा मेनिलेयसचा भाऊ ट्रॉयच्या युद्धात गुंतला असताना त्याची पत्नी क्लायटेमेनेस्ट्रा ही हेलेनची बहीण (स्पार्टाचा राजा मेनिलेयसची हेलेन ही पत्नी) इगिस्थसचा प्रियकर म्हणून स्वीकार करते आणि त्याच्या बरोबर अर्गोसचे राज्य चालवते. काही कालानंतर ॲगामेम्नन युद्धाहून परत येतो. त्याच्या बरोबर प्रायमची कन्या कॅसाण्ड्रा ही असते. परंतु परत येण्यापूर्वी देववाणीच्या आज्ञेवरून त्याने आपली कन्या इफिजिनिया हिचा बळी दिलेला असतो. क्लायटेमेनेस्ट्रा आपल्या प्रियकाराच्या संगनमताने आपल्या पतीचा खून करते. ह्या प्रकाराने व्यथित कृद्ध झालेली ॲगामेम्ननची कन्या इलेक्ट्रा आपल्या भावाच्या - - ओरेस्टस्च्या परतीची वाट पाहू लागते. ओरेस्टसला त्याच्या मातेने - क्लायटेमेनेस्ट्राने - पूर्वीच देशाबाहेर युद्धकलांचे शिक्षण घेऊन प्राविण्य मिळविण्यासाठी पाठविलेले असते. परत आलेला ओरेस्टस आपल्या मातेने केलेल्या कृष्णकृत्याने हादरून जातो आणि प्रतिशोध म्हणून आपल्या मातेचा आणि तिच्या प्रियकराचा वध करतो. मातृवधाच्या महान अपराधामुळे कोप देवता (Furies) त्याला भयंकर यातना देतात. यातना चक्राच्या भ्रमंतीनंतर दारूण अवस्थेत तो अथेन्सला येऊन पोहोचतो. तेथे त्याला अथीना देवतेने ॲरिओपेगस् ह्या पर्वतावर भरवलेल्या न्याय परिषदेपुढे आपल्या कृत्याचे समर्थन करावे लागते. ही न्याय परिषद शेवटी त्याला दोषमुक्त करते. हे प्रसंग इस्किलसने आपल्या ओरेस्टिया ह्या त्रिनाट्यात परिणामकारक रीतीने चित्रित केले आहेत. ॲगामेम्नन ह्या पहिल्या भागात प्रमुख पात्राचा दण्डनीय अहंकार आणि घराण्याची शापित आणि अपराधित्वाची परंपरा ह्या आशयसूत्राची व्यामिश्र अभिव्यक्ती आहे. ॲगामेम्ननचे ट्रॉयच्या युद्धातून स्वगृही येणे हे ग्रीक

प्रेक्षकांना ऐतिहासिक महत्वाचे वाटत होते. तसेच ह्या महारथी ग्रीक योध्याची त्याच्या पत्नीने व तिच्या प्रियकराने केलेली निर्घृण हत्या ही थरारक घटना होती. त्याचा मृत्यू हा केवळ पत्नीच्या विश्वासघाताचाच परिपाक नसून त्याच्या विनाशाला कारणीभूत झालेल्या अन्य कारण परंपरेचा शोध घेण्याची प्रक्रिया ह्या नाटकात इस्किलसने सूचित केली आहे. दैवी प्रेरकता, मानवी प्रेरकता, व्यक्तिगत व कौटुंबिक अपराधित्व आणि कालसापेक्ष घडलेली कृत्ये यांच्या संघटित परिणामांचा परामर्श हा या शोध प्रक्रियेचा आत्मा होय. स्वतःच्याच पापकृत्यांनी आपला झालेला विनाश ॲगामेमन्नला अनुभवावा लागतो. ट्रॉय मधील देवालयांचा विध्वंस व आत्यंतिक गर्वामुळे केलेल्या देवांच्या आज्ञेचा अवमान त्याचा विनाश घडवून आणतात. त्याच्या मृत्यूचे भविष्य कॅसाण्ड्राने अगोदरच वर्तविलेले असते पण त्यावर कोणाचा विश्वास बसत नाही. तिची भविष्यवाणी वरील कारण परंपरा स्पष्ट करते. ॲगामेम्न्नचा विनाश हा दैवी आणि मानवी घटनांनी घटवून आणलेला असून त्रिनाट्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या भागांमध्ये ॲगामेमन्नचा पुत्र ओरेस्टस व कन्या इलेक्ट्रा यांना या घटनांचा परिणाम भोगावा लागतो हे इस्किलसने कौशल्याने दाखविले आहे. त्याच्या त्रिनाट्यात ॲगामेमन्न व ओरेस्टस ह्या नायकांच्या व्यक्तिरेखा इलेक्ट्राच्या व्यक्तिमत्वापेक्षा अधिक स्पष्ट व उठावदार झालेल्या आहेत. इलेक्ट्रा ही त्रिनाट्याच्या मध्यावर रंगमंचावर येते आणि आपल्या भावाला सूड घेण्याची प्रेरणा देते. सॉफोक्लिजच्या <u>इलेक्ट्रा</u> नाटकात इलेक्ट्रा आपले अविवाहित आयुष्य आपल्या पित्याच्या मृत्यूमुळे शोकमग्न अवस्थेत व्यतीत करते. तिच्या नावाचाच अर्थ हा 'पुष्यशय्येला वंचित झालेली' असा आहे. आपल्या मातेने प्रियकाराच्या संगनमताने पित्याच्या केलेल्या खुनाला ती साक्षीदार आहे. पित्याच्या ह्या खुनामुळे सुडाने पेटलेल्या अवस्थेत ती आपला भाऊ ओरेस्टस ह्याच्या मदतीने क्लायटेमेनेस्ट्रा आणि इगिस्थस ह्यांची हत्या यशस्वी रीतीने घडवून आणते. युरिपिडिजच्या <u>इलेक्ट्रा</u> आणि <u>ओरेस्टस</u> ह्या दोन नाटकात इलेक्ट्रा ही व्यक्तिरेखा आहे. पहिल्या नाटकात इलेक्ट्रा ही विवाहित स्त्री आहे. तिचा विवाह इगिस्थसने एका दरिद्री शेतकऱ्याशी केलेला आहे. परंतु हा शेतकरी पती तिच्याशी समागम करीत नाही. अशा अवस्थेत दारिद्र्यात व गुलामगिरीत काळ कंठणारी इलेक्ट्रा ही आपल्या पित्याच्या मृत्यूच्या दुःखाने शोकाकुल झालेली असली तरी पित्याच्या प्रेमापेक्षा आईचा तिरस्कार आणि असूया यांनी जास्त भारलेली आहे. त्यामुळे ती आईची हत्या घडवून आणते पण इगिस्थसला दोषमुक्त ठरवते. त्यामुळे तिचे व्यक्तिमत्व तिरस्करणीय व अनैसर्गिक वाटते. नाटकाच्या शेवटी देवतांच्या संमतीने तिचा विवाह पायलाडेजशी होतो. ज्या अपोलो देवाने ओरेस्टसला मातृहत्येकरीता प्रवृत्त केले त्याच्या प्रगल्भते विषयी युरिपिडिजने संशय व्यक्त केला आहे. दुसऱ्या नाटकातील इलेक्ट्रा ही आपल्या भावाची मनोभावे शुश्रूषा करते. हा भाऊ मातृहत्येने दुःखी व वेडापिसा झालेला असतो. ह्युगोफॉन हाफमन्स्थाल ह्या आधुनिक युरोपियन नाटककाराच्या १९०४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या <u>इलेक्ट्रा</u> नाटकात असे दाखविले आहे की ओरेस्टस मातेचा वध करत असता त्याची भगिनी इलेक्ट्रा बेभान नृत्य करते आणि अत्यानंदाच्या भरात कोसळून मरण पावते.

(४)

ओनिलने आपल्या शोकनाट्यात आधुनिक इलेक्ट्रा – लव्हिनिया – निर्माण करताना पूर्वीच्या नाटककारांच्या नाटकातील इलेक्ट्रा या पात्राचे पूर्णतः अनुकरण केलेले नाही. परंतु इस्किलसच्या <u>ओरेस्टिया</u> ह्या त्रिनाट्याच्या संविधानकाचे व पात्रांचे त्रिनाट्यातील संविधानक व पात्रे ह्यांच्याशी साम्य दाखविण्याची संकल्पना निश्चित व स्पष्टपणे मांडलेली आहे. त्याच्या शोकनाट्यातील मॅनन घराणे ॲट्रियस घराण्याप्रमाणेच शापित आहे. ॲब आणि डेव्हिड हे दोघे भाऊ मारी ब्रॅन्टोम ह्या प्रेमपात्राशी असलेल्या प्रेमप्रकरणात एकमेकाचे प्रतिस्पर्धी असतात. मारी ही ॲबच्या मुलाची दाई असते. तिला डेव्हिड पासून गर्भधारणा झालेली आहे असे कळल्यानंतर मत्सर ग्रस्त झालेला ॲब रागाने तसेच दुष्कीर्तीला भिऊन डेव्हिडला व मारीला घराबाहेर काढतो. पूर्वीचे आपले घर जाळून टाकून त्याजागी जणू द्वेषाचे प्रतिक असलेले भीती उत्पन्न करणारे नवीन घर बांधतो. डेव्हिडला काही अंशी संपत्तीचा वाटा देतो परंतु काही काळानंतर डेव्हिडला अतिरिक्त मद्यपान करण्याचे व्यसन

लागते. त्याला काम धंदाही मिळत नाही. निराशेच्या गर्तेत तो असहाय्यपणे आत्महत्या करतो आणि पत्नीला व लहान मुलाला — ॲडमला — निराधार अवस्थेत सोडतो. वयाच्या १७ व्या वर्षी हा ॲडम सागरी साहसा करता घराबाहेर पडतो. त्याची आई मारी एझरा मॅन्न जवळ मदतीची याचना करते व त्याची करूणा भाकते पण ॲबचा पुत्र एझरा ती धुडकावून लावतो. ॲडम जेव्हा सागरी सफरीवरून परततो तेव्हा त्याला आपली आई मरण पावल्याचे कळते. त्याचवेळी तो आपल्या आईवडिलांच्या मृत्यूचा सूड घेण्याची शपथ घेतो. आता त्याने ॲडम ब्रॅण्ट हे नाव धारण केलेले असते. अशी ही ओनिलच्या त्रिनाट्यातील पार्श्वभूमी आहे. प्रत्यक्ष त्रिनाट्याच्या संविधानकामध्ये असे घडते की एझरा मॅनन (ॲगामेमन्नशी साम्य) आणि त्याची पत्नी क्रिस्टिन (क्लाय्टेमेनेस्ट्राशी साम्य) ह्यांना लव्हिनिया (इलेक्ट्राशी साम्य) ही कन्या आणि ओरीन (ओरेस्टस्‌शी साम्य) हा पुत्र असतो. क्रिस्टिन ॲडम ब्रॅण्टच्या (इगिस्थसशी साम्य) प्रेमात पडते. ते दोघे प्रियकर व प्रेयसी क्रिस्टिनच्या पतीला मारण्याचे कारस्थान रचतात. अमेरिकन यादवी युद्धातून एझरा मॅनन परल्यानंतर त्याची पत्नी क्रिस्टिन विष प्रयोग करून त्याची हत्या करते. लव्हिनियाचेही ॲडमवर प्रेम बसते पण तिला आपल्या आईचे – क्रिस्टिनचे – आणि ॲडमचे प्रेम संबंध आहेत हे कळल्यावर ती बेचैन होते. ओरिन ह्या आपल्या भावाला ती आईच्या प्रेमप्रकरणाची माहिती सांगते तसेच आपल्या वडिलांच्या मृत्यूचे गूढ सत्य समजल्यावर ते ही त्याला सांगते. एका अर्थाने पित्याच्या मृत्यूचा सूड घेण्याच्या उद्देशाने तो लव्हिनियाच्या संगनमताने ब्रॅण्टला ठार करतो. परंतु वस्तुस्थिती वेगळीच असते. आपल्या आईबद्दल कामवासना निर्माण झाल्याने बेचैन होऊन स्वतःवरच सूड उगवण्याकरता त्याने हे कृत्य केलेले असते. क्रिस्टिन आत्महत्या करून स्वतःचा शेवट करून घेते. आपले जिच्यावर वासनामय प्रेम बसले आहे अशा ह्या स्त्रीच्या (आईच्या) मृत्यूला आपणच जबाबदार आहोत असा समज झाल्याने ओरीन दुःखातिशयाने व पश्चातापाने वेडापिसा होतो. लव्हिनियाचे पिटर नाईल्स ह्या तिच्या प्रियकराशी लग्न ठरलेले असताना ते होऊ नये ह्या हेतूने तो आपल्या बहिणीला त्यांच्या दोघांच्या संमतीने घडलेला गुन्हा उघड करण्याच्या धमक्या देऊन त्या लग्नापासून परावृत्त करतो. त्याचा स्वतःचाही विवाह हेझल नाईलशी ठरलेला असतो. परंतु स्वतःच्या गुन्ह्याच्या कृत्याची सतत टोचणी लागल्याने यातना ग्रस्त झालेला ओरीन लव्हिनियाला विकृत झालेला दिसतो. आता त्याच्या आईसारखी वागणारी व दिसणारी लव्हिनिया त्याला आत्मघात करण्याचा सल्ला देते. वेडापिसा झालेला ओरीन नंतर दुष्कृत्यांनी घृणास्पद झालेल्या आपल्या घराण्याचा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न करतो. घराण्याच्या कृष्णकृत्यांच्या भीषण परंपरेमुळे बाह्यजगाशी आता त्या दोघा बहीणभावांचा संबंध तुटलेला असतो. स्वतःचा विवाह स्थगित केल्याचे वचन भावाला देऊन लव्हिनिया त्याला अशा लिखाणापासून परावृत्त करते. परंतु असे घडते की तो आपल्या भगिनीशी असंमत व व्यभिचारी समागमाची इच्छा अप्रत्यक्षपणे व्यक्त करतो कारण लव्हिनिया आता त्याला क्रिस्टिन प्रमाणेच दिसू व भासू लागते. ह्या अकल्पित घटनेची त्याने वाच्यता करू नये असा लव्हिनिया प्रयत्न करते. ओरीनला आत्महत्या करण्यावाचून दुसरा पर्याय नसतो. अभ्यासिकेत स्वतःवर गोळी झाडून घेऊन तो आपले जीवन संपवितो. त्याला अपघाती मृत्यू आल्याचे लव्हिनिया जाहीर करते. हेजलला ओरीनच्या मृत्युबद्दल काहीतरी काळेबेरे असल्याची शंका येते म्हणून ती लव्हिनियाला आपला भाऊ पिटर ह्याच्याशी विवाह न करण्याचे सुचविते. मॅनन घराण्यातील मृत व्यक्ती आपल्याला सातत्याने पछाडतील ह्या समजुतीने लव्हिनिया हा विवाह स्थगित करते आणि आत्मक्लेश म्हणून पूर्णपणे बंद केलेल्या मॅनन सदनात स्वतःला कोंडून घेऊन मृत मॅनन व्यक्तींच्या सहवासात एकाकी राहण्याचा निर्णय घेते व कोपदेवतांच्या क्रोधाला सामोरे जाते आणि यातनाचक्रात स्वतःला विलीन करून घेते.

ओनिलच्या त्रिनाट्याला लाभलेली न्यू इंग्लंड प्रदेशाची पार्श्वभूमी ही तेथील कॅल्‌विनिस्ट आणि प्युरिटन ह्या ख्रिश्चन धर्मपंथांच्या श्रद्धांच्या प्रभावामुळे ग्रीक शोकात्मिकेच्या साम्याशी जवळीक साधणारी आहे. जन्मजात पाप अपराध आणि दण्डनीयता या धार्मिक संकल्पना नियततावादाला पोषक असल्यामुळे ह्या त्रिनाट्याला अभिजात शोकात्मिकेच्या पातळीवर नेतात.

विनाशकारी कोपदेवता नियतीच्या प्रभावरूपाने प्रमुख पात्रांना पापकृत्याबद्दल यातना देतात परंतु ओनिलच्या त्रिनाट्यात त्यांचे रूपांतर कॅल्विनिस्ट पंथातील मनुष्याच्या सद्सद्विवेक बुद्धीला दिलेल्या प्रभावात दिसून येते. ती त्याला क्रूरकृत्याबद्दल शिक्षा म्हणून स्वतःशीच शत्रुत्व करण्यास प्रवृत्त करते. अमेरिकन यादवी युद्धाच्या काळात घडणारे संविधानक आणि ग्रीक वास्तुरचनेशी साम्य असलेले मॅनन निवासस्थान हे घटनास्थल अभिजात शोकनाट्याच्या सादृश्याची परिणामकारक रीत्या आठवण करून देते. तसेच नगरवासियांची कोरससारखी उपयोगिता मॅनन कुटुम्बियांच्या भयावह नाट्यप्रसंगावर त्यांनी केलेल्या भाष्यावरून लक्षात येते. शोकात्मिकेचे आशयसूत्र व्यक्त करणारे गीत मॅननगृहाचा वाटिका व्यवस्थापक सेथ वेकविथ पुनः पुनः गातो. हे गीत ग्रीक दैव संकल्पनेचा आधुनिक मानसशास्त्रीय आविष्कार करते व पात्रांचे अनैसर्गिक संबंध तसेच त्यातून निर्माण झालेले पितृगंड, मातृगंड, तसेच असम्मत व्यभिचारी लैंगिक संबंधाची सूचना इत्यादी अस्वाभाविक घटनासूत्रांचाही निर्देश करते. ह्या त्रिनाट्याच्या तिसऱ्या भागाच्या (नाटकाच्या) जवळ जवळ मध्यापर्यंत इस्किलसच्या ओरेस्टिया ह्या त्रिनाट्याशी संविधानकाचे साम्य जाणवते. त्यानंतर मात्र इस्किलस, सोफोक्लिज् आणि युरिपिडीज् ह्यांच्या शोकनाट्यांपेक्षा त्याचे वेगळेपण दिसते. लव्हिनियाशी असम्मत व्यभिचारी भगिनी समागमाची इच्छा व्यक्त करणारा ओरिन आपल्या अस्वाभाविक वृत्तीची व मनोविकाराची जाणीव होऊन आपला शेवट करून घेतो. त्याच्या मातृगंडाची जागा आता भगिनी समागमाच्या विकृत वासनेने (incest) घेतलेली असते. मृत व्यक्तीशी सामंजस्य होणे हे संबंधित माणसाला जवळजवळ अशक्य प्राय असते हे आशयसूत्र ओनिल आणि ग्रीक नाटककार यांना समान आहे. ओनिलच्या त्रिनाट्याचा अन्त हा लव्हिनियाच्या बंदिस्त मॅनन सदनामध्ये एकाकी जीवन व्यतीत करण्याच्या निर्णयामध्ये होतो तो ग्रीक शोकात्मिकेच्या सत्वाची आठवण करून देणारा आहे. शोकात्मिकेच्या परिणामाचे उन्नयन त्यामुळे अनुभवता येते. परंतु कोणत्याही ग्रीक नाटककाराने इलेक्ट्रा या पात्राला मध्यवर्ती स्थान दिलेले नाही. ओनिलने लव्हिनियाला (इलेक्ट्राशी सामर्थ्य असलेली) त्रिनाट्याच्या पहिल्या भागाच्या अन्तापासूनच ते दिलेले आहे. वैयक्तिक स्वार्थापेक्षा घराण्याचे उत्तरदायित्व तिला महत्वाचे वाटते. पिटर नाईल्सशी स्वतःचा ठरलेला विवाह तिने स्थगित केलेला आहे. स्वतःचा अन्त करून घेऊन मॅनन घराण्याच्या शापित परंपरेपासून समाजाला मुक्तता देण्याचा तिचा निर्णय हा ओनिलच्या शोकनाट्याचे वेगळेपण दर्शवितो. मानवाचे उत्तरदायित्व ही संकल्पना ग्रीक शोकनाट्यात नाही. ओनिलच्या शोकनाट्याचे ते महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य आहे. ग्रीक शोकात्मिका आणि ओनिलची शोकात्मिका यांच्यातील भिन्नता असण्याचे कारण हेतूंची भिन्नता आहे असे म्हणता येईल. इस्किलसच्या आशयसूत्राचा संबंध मानवी आणि दैवी अधिनियमांच्या विजयी सूचकतेशी आहे. भूतलावर न्याय व्यवस्थेची पुनःस्थापना करणे, समाजाचे देवतांशी सामंजस्य प्रस्थापित करणे, तसेच असत्‌च्या जागी सत्‌ची स्थापना करणे, अराजकातून सुव्यवस्था आणि दुःखातून शाश्वत ज्ञानमय सुखप्राप्ती ही इरिकलसच्या शोकनाट्याची उद्दिष्टे आहेत. मोर्निंग बिकम्स् इलेक्ट्रामध्ये शापमुक्ती घडत नाही. लव्हिनियाच्या अयशस्वी संघर्षाचा शेवट मानसिक कोपदेवतांच्या दण्डनीयतेच्या मनोयातना सहन करण्यात होतो. ओनिलच्या शोकात्मिकेचा परिणाम केवळ करुणा व भीती ह्या भावनांचे उद्दिपन करण्यात होतो असे नसून भयग्रस्ततेने निर्माण होणारी शोकमग्नता प्रेक्षकाला ग्रासून टाकण्यात होतो एवढेच भावनांचे विरेचन घडते.

मॅनन घराण्याच्या व्यक्ती जीवन आणि मृत्यू ह्यांच्या संघर्षात मृत्यूलाच शरण जाताना दिसतात. ओनिलने ह्या त्रिनाट्यात फ्राईडच्या अहम् (ego) आणि (id) इदम् ह्यांच्या विरोधात अनुक्रमे मृत्यू ह्या सहजप्रेरणेचा जीवन ह्या सहजप्रेरणेशी चाललेला तीव्र झगडाच नाट्यस्वरूपात आविष्कृत केला आहे असे टीकाकारांचे मत आहे. मॅनन कुटुंबियांवर मृत्युप्रेरणाच विजय मिळवते. एझरा मॅनन म्हणतो, 'Life was dying. Being born was starting to die. Death was being born.' ही वचने फ्राईडच्या विचारांशी साम्य दर्शवितात. ओरिनचे आपल्या मातेविषयी वासनायुक्त प्रेम आपल्या भगिनीवर संक्रामित होते कारण मातेचे भगिनीशी

विलक्षण साम्य आहे. लव्हिनियाचे वासनायुक्त प्रेम पित्यावर आहे ते ब्रॅन्टवर संक्रमित होते कारण तिचा पिता आणि ब्रॅन्ट ह्याच्यामध्येही विलक्षण साम्य आहे. ओरिन आणि लव्हिनिया आपल्या मातापित्याचीच प्रतिबिंबस्वरूपे आहेत. परंतु त्यांचा अन्त शेवटी स्वतःच्याच प्रतिबिंब स्वरूपात (mirror image) ही स्वरूपे विलीन होण्यात होतो. ह्या तीव्र अहंभावाचा अन्त मृत्यूला कवटाळण्यात होतो. फ्राईडच्या सिद्धान्तांना विशेषतः अनैसर्गिक अमान्य लैंगिक आर्कषणाला (incest) आणि सातत्याने येणाऱ्या आत्मविश्लेषणाला (self - analysis) नाट्यस्वरूप देण्याचा ओनिलचा प्रयत्न दिसतो. पण त्यामुळे शोकनाट्याच्या परिणामकारकतेला व सत्वाला हानी पोहोचलेली आहे असे काही समीक्षक म्हणतात. मनोविश्लेषणाच्या संकल्पनेवर व आशयसूत्रावर ओनिलच्या त्रिनाट्याची उभारणी झाली असल्याने शोकनाट्याची घनता, शुद्धता आणि तीव्रता कमी झाली आहे. वस्तुतः मोर्निंग बिकम्स इलेक्ट्रा ही शोकात्मिका पात्रांमधील लैंगिक तणाव आणि त्यातून निर्माण होणारा नैतिक व आत्मिक आत्मसंघर्ष नाट्यकृतीत व्यक्त करताना ओनिल स्ट्रिंडबर्ग ह्या युरोपियन नाटककाराचा आपल्यावरील प्रभाव दर्शवितो. ओनिलने असे म्हटलेच होते की पूर्वीच्या नाटककारांच्या कलाकृतीत मानव व देवता यांचा संघर्ष होता. आता मानवाचा स्वतःच्या अतीताशी प्रेरणांशी व विकारांशी आंतरिक संघर्ष आहे.

ओनिलच्या त्रिनाट्यात पात्रांची व्यामिश्र प्राक्तने आणि परस्पर संबंध अत्यंत परिणामकारकरीत्या ग्रंथित केलेले आहेत. पती - पत्नी, पत्नी - प्रियकर, पिता - कन्या, पिता - पुत्र, माता - कन्या, माता – पुत्र आणि भगिनी – भ्राता असे सात प्रकारचे संबंध आहेत. होमकमिंग ह्या पहिल्या भागात एझरा मॅननच्या मृत्यूच्या तथाकथित नैसर्गिक कारणमीमांसेत पहिले तीन संबंध विलीन होतात. दुसऱ्या भागातील द हन्टेडमध्ये ब्रॅन्टचा मृत्यू आणि क्रिस्टीनच्या आत्महत्येच्या प्रसंगांचा परिणाम पुढील तीन संबंधांचा अंत होण्यात होतो. तिसऱ्या भागात द हॉन्टेड मध्ये एझरा आणि क्रिस्टीन ह्यांच्या मृत्यूच्या पश्चात् त्या दोघांच्या अदृश्य अस्तित्वाने व्यापलेला आहे आणि उर्वरित मॅनन कुटुंबिय ओरिन आणि लव्हिनिया हे दोघे त्याने पछाडलेले आहेत. ओरिनच्या आत्महत्येनंतर लव्हिनिया स्वतःला शासन करून यातना स्वीकारते पण यातनाचक्रातून तिला मुक्ती आणि शांतता मिळत नाही. मृत्यूचे तांडव सुरूच राहते. त्याचा अन्त होत नाही. म्हणूनच शोकात्मिकेच्या त्रिनाट्याचे शीर्षक अर्थपूर्ण वाटते. 'इलेक्ट्रा (लव्हिनिया) शोकमग्न असणे योग्य आहे' किंवा 'इलेक्ट्राने (लव्हिनियाने) परिधान केलेली काळ्या रंगाची वस्त्रप्रावरणे तिच्या काळ्याकुट्ट प्राक्तनाच्या काळ्या रंगाला व मृत्यूच्या रंगाला साजेशी आहेत' असा त्याचा अर्थपूर्ण आशय समर्पक वाटतो.

ग्रीक अभिजात शोकनाट्याच्या आधुनिक आविष्कारामध्ये मृत्यूची निरंतर सत्ता प्रस्थापित करून त्याला मानवी उत्तरदायित्वाचा आयाम देणे हे ओनिलचे आधुनिक शोकात्मिकेला महत्त्वाचे योगदान आहे.

✠✠✠

# आदिवासी लोकनृत्य

## डॉ० भास्कर व्यं. गिरिधारी

आदिवासी लोकनृत्य (Tribal Folklore) यात 'लोक' शब्द जोडलेला असल्याने समूह नृत्य विचार अभिप्रेत आहे. लोकविद्या, लोकसाहित्य लोकसंस्कृतीचे एक अंग म्हणूनच या लोकनृत्य कलेचा विचार येथे प्रस्तुत आहे.

आदिवासींचे जीवनमान आणि राहणीमान लक्षात घेता, सामूहिक भावनेला कटाक्षाने जपणारा हा समाज आणि त्याची संस्कृती आहे.

<u>लोकनृत्याचा मनसोक्त आविष्कार :-</u>

आदिवासी लोकजीवनामध्ये लोकनृत्यकलेला फार मोठे श्रद्धेचे स्थान आहे. लोकनृत्य हा त्यांच्या जीवनाचा एक अविभाज्य, अपरिहार्य घटक आहे. नाचगाणे ही त्यांची जीवनशैली बनली आहे. त्यामुळे लोकनृत्याचा मनःपूत, मुक्त आविष्कार त्यांच्या जीवनात अनुभवायला मिळतो.

कृषिसंस्कृतीमधील शेतमजुराचे, ग्रामीण व्यवसायांमधील मासेमारीचे किंवा शहरी रोजगारहमीचे, धरणाच्या, विटभट्टीच्या कामावरचे, काबाड कष्टाचे जिणे शिवाय कमालीचे दारिद्र्य आदिवासींच्या वाट्याला आले आहे.

'काम काम बघू काम कुठच भरेना
बाई पोटातील आग, आग कुठ इझना'

शेवटी – 'ओल्या डोळ्यांनीच पोर निजवावी लागतात.'

असा हा आदिवासी माणूस दारिद्र्यातच जन्मतो, वाढतो आणि शेवटी दारिद्र्यातच मरतो. तरीही आदिवासी माणसांनी गीत – नृत्य – संगीतातील चैतन्य टिकवून ठेवले आहे. दुःख विसरायला लावणारी, जीवनातला आनंद देणारी, बेहोषी, एक विरंगुळा, श्रमपरिहार करणारी ही लोकनृत्यकला त्यांनी जोपासली, आजतागायत जपली आहे.

निसर्गाशी सुसंवाद साधणारे, आगळे स्वरूप हे या कलेचे वैशिष्ट्य आहे. नृत्यकलेतील वैभव ही आदिवासी लोकनृत्यकला ठरू शकेल. ताल कसा धरावा, लय कशी पकडावी, नाद कसा साधावा, ठेका कसा सांभाळावा, वाद्यांच्या साथीने धुंद नाचावे कसे, ढोल, संबळ इ. लोकवाद्यांचा डांगोरा कसा पिटावा, झोकात पावलं कशी टाकावीत, खांद्याला – पाठीला हाताच्या विळख्यांची घट्ट पकड कशी बांधावी, हुर्ये ऽऽऽ उद्‌गार चित्कार घोषणांचा जल्लोष कसा करावा, मनोरे-कसरतीची-चमत्कृतीची नृत्याला जोड कशी द्यावी, वेषभूषा — रंगभूषेतील वैचित्र्य कसे राखावे, नाचात वाघ, सिंह, मोर यासारख्या पशू – पक्षांची सोंगे कशा वठवावीत, नृत्याच्या धुंदीनं सारा पाडा – परिसर कसा डोलवावा, नृत्याच्या धुंदीनं भावनेने, संकोच सोडून, फेर धरून, मुक्तपणे कसे नाचावे, हे सारे आदिवासी लोकनृत्यातून शिकण्यासारखे म्हणूनच अनुकरणीय आहे.

<u>आदिवासी लोकसंस्कृतीचे प्रतिबिंब :-</u>

'आम्ही जंगलचं राजं वनवासी' आधीपासून जंगलात राहणारे जंगलचे राजे, वन निवासी म्हणून वनवासी, डोंगर-गिरिदऱ्यात राहणारे म्हणून गिरिजन, वनउपजावर जगणारे खरे स्वावलंबी-स्वयंपूर्ण असे आहेत. साऱ्या सभ्यता पाळून कळपाने, टोळीने, एकोप्याने सामुदायिक जीवन ते जगत आलेले आहेत. याच आदिवासी लोकसंस्कृतीची गडद छाया त्यांच्या लोकनृत्य कलेवर पडलेली आहे. आदिवासींच्या सांस्कृतिक जीवनापासून कलेच्या कक्षा अलग होत नाहीत. त्यांच्या कलांचा रसस्वाद म्हणूनच त्यांच्या धर्मश्रद्धा, रूढी, परंपरा, लोकनृत्य, लोकगीते, लोककथा या लोकविद्यांच्या संदर्भातच घ्यावा लागतो.

<u>आदिवासी लोकनृत्याचा आविष्कार :-</u>

आदिवासींमधील तीन पिढ्या आजोबा, मुलगा आणि नातू असे आबालवृद्ध स्त्री – पुरुष लोकनृत्याच्या या फेऱ्यात पूर्णतः गुंतलेले असतात. त्या नृत्याचा मनसोक्त आनंद ते मुक्तपणाने लुटतात. त्यांच्या फेर धरून नाचण्यातील अंगविक्षेप, पदन्यास, वेषभूषा – रंगभूषा,






सजावट सारेच प्रेक्षणीय असते. फेरातील परिचित–अपरिचित भाव विसरून, स्त्री पुरुषांनी खांद्यावर किंवा कमरेत, नाचतांना, हात गुंफलेले असतात. नाचता नाचता ते घामाघूम होतात, बेभान होतात तरीही कमरेतील हातांचा विळखा – खांद्यावरची घट्ट पकड कधी सैल होत नाही. यावेळी मनात कोणतेही किल्मिष नसते. कोणताही दुर्भाव नसतो. पाश्चात्यांच्या नृत्यातील 'समारोप' येथे नसतो. सगळ्यांच्या सहभागाने साजरे होणारे हे नृत्य त्यांच्यात जन्मापासूनच भिनलेले असते. ही नृत्यकला आदिवासींचा अविभाज्य धर्मच बनली आहे. रंगात आलेल्या या लोकनृत्यात आदिवासींचे 'हुर्ररऽऽ', 'हुर्योऽऽ' या आरोळ्या, चित्कार लोकनृत्याची लज्जत आणखी वाढवतात. सारा गाव जागा होतो.

'शिवू शिवू कुठं बाई, सारं आभाळ फाटलं
अन तान्ह बाई माझं, ओल्या डोळ्यानं निजलं.'

अतिग्रामीण भागात, अर्धपोटी ठेवणाऱ्या दारिद्र्याच्या आगीत होरपळणाऱ्या आदिवासींना ही लोकनृत्ये आधार बनतात. जीवनाला उभारी, मोठा दिलासा देतात. कष्टकऱ्यांचा कष्टाचा भार हलका होतो. नृत्यांची धुंदी तारून नेते, सावरते.

आदिवासी लोकनृत्याला निसर्गाचे वरदान :–

आदिवासी लोकगीत आणि लोकनृत्याला निसर्गाचा लय, ताल, सूर, नाद, स्वर, सादरीकरण या सगळ्याच बाबतीत 'वरदहस्त' आहे. याच निसर्गाच्या सान्निध्यातून आणि अनुकरणातून त्यांना लोकनृत्य – गीतांचा बाज गवसलेला आहे. निसर्गाचे वरदान म्हणूनच त्यांचे लोकसंगीतही अवतरलेले आहे.

आदिवासींचा 'निसर्ग' हाच गुरू असून ते त्याचे पुजारी आहेत. निसर्गरम्य आनंदाचा ठेवा म्हणजे आदिवासी लोकनृत्य होय. अभ्यास आणि संशोधन याची खात्री पटविते. लोकपरंपरेने, लोकधारीतील, लोकसृष्टीतील हे आविष्कार परस्परपूरक आणि संबद्ध आहेत. आदिवासींना निसर्गातून जे काही उपलब्ध होते त्याचाच वापर ते आपल्या साजशृंगारात करतात. जंगलातली फुले, बिया, रंगीबेरंगी दगड, कातडी, मणी, गुंजा, झाडांच्या साली, वाकलेली पाने, मुळ्या यांच्यापासूनच त्यांचे दागदागिने बनतात.

आदिवासी–संस्कृतीच्या जडणघडणीत निसर्गाचा मोठा वाटा आहे. निसर्गाने आदिवासींची पारंपारिक जीवनपद्धती आपल्या संगतीने राखली आहे. आदिवासी आणि निसर्ग असे अन्योन्याश्रयी आहेत; लोकनृत्ये याची साक्ष, ग्वाही देतात. आदिवासी माणूस निसर्गाचेच जणू अपत्य आहे. निसर्गाच्याच साथीने त्यांच्या लोकनृत्याच्या आविष्काराला ताजेपणा, नित्यनूतनता, नवता लाभली आहे. त्यांच्या कलानिर्मितीचे सारे रहस्य सृष्टी देवतेतच सापडते.

मी या धरतीला, मायमातीला पाय कसा लावू? मग मी नाचू कुठे? धरणी माझी काळी आई आहे; हा आदिवासीला पडलेला पहिला प्रश्न आहे.

'हत नाचू ...... का तथं नाचू ......
कुठं मी नाचू .... कसा मी नाचू ?
धरती माझी माय हाय ........'

ज्या धरतीवर नृत्य साजरे व्हायचे त्याविषयीची ही या निसर्गपुत्राची श्रद्धा, निसर्गाला त्यांच्या लोक जीवनात लाभलेल्या श्रेष्ठ स्थानाचे प्रतीक आहे. पावसाळ्यात होणारी अविरत बरसात, अखंड पाऊस धारांचा वर्षाव, आकाश मेघांचा गडगडाट, मेघगर्जना, श्रावणमासातील सोनेरी पिवळी उन्हे, पाऊसाची मधून भूरभूर, गार शिडकावे, हिरवीगार वनश्री, भरास आलेल्या पिकांचे डोलणे, वाहत्या वाऱ्यांचे ध्वनी, सृष्टीतील वादळवारा, गारांचा वर्षाव, विविध पशु, पक्षी, कीटक यांच्या विभिन्न हालचाली या विषयीची आदिवासींची निरीक्षणे त्यांच्या लोकनृत्यात टिपली गेली आहेत.

साप, नाग, शेलाटी, धामण यांचे फुत्कार, वळसे घेणे, सरपटणे, विळखे घेणे, त्यांचे आकार या नृत्यात साकार झाले आहेत. पशुपक्ष्यांच्या हालचाली, आवाज चित्कार याचे अलौकिक अनुकरण या लोकनृत्यात आहे. मोकळ्या मनाने हे निसर्गाने दिलेले धडे त्यांनी गिरविले आहेत.

लोकनृत्याला पूरक लोकगीते :–

आदिवासी लोकनृत्यात गायली जाणारी लोकगीते नृत्याला पोषक असतात. वाद्यांच्या गजरात मात्र गाणे हरवून जाते. या गाण्याचे शब्द कळत नाहीत. तसे गाणे पुनरूक्तीने भरलेले फारसे अर्थपूर्ण असतेच असे

नाही. गीत स्वतंत्रपणे शब्दार्थासह आपल्याला समजून घ्यावे लागते. गीतातील शब्दयोजना गतिशील आणि नृत्यातील जोश–जल्लोष वाढविणारी असते. नृत्याला पूरक असते. अनेकदा नृत्यगीतांचा आशय हा प्रत्यक्ष सादरीकरणातून त्यावेळच्या अभिनयातून अभिव्यक्त केला जातो.

'किल्ल्याना भिल्लनी, खेळ करनी।
आम्ही डोळाम, काजळ घालनासी ।।१।।
आम्ही डोळा, मोडी मोडी नाचनारनी।
आम्ही नाक म नथ घालणानारनी।।२।।'

अशी ही लोकगीतातील शब्दांची ठेवण, त्यांची लय आणि नर्तकांचे कायिक हावभाव यातून ते संपूर्ण नृत्याचे दृश्य सादर होते. बारश्याच्या प्रसंगीही असेच नाचत मुलाच्या घरी गाणे म्हणतात. नृत्यगानाचा आनंद लुटतात.

'वरखडीत जावानी गाडी सजणे, शंकर देवानी
पार्वती नटनी लक्ष्म्या आईने पूजा थोपनी।
शंकर देवानी पूजा थोपनी, धावत या कोणी
पळत या आईला गावात न्या।।'

<u>आदिवासी लोकनृत्यातील विविधता :–</u>

आदिवासींच्या एकेका लोकनृत्यात सुसंघटितपणा एकमेळ, एककृती, समान पदन्यास असले तरी त्याचे विविध प्रकार आहेत. त्यात वैचित्र्य आणि विविधता आहे. आदिवासींमध्ये भावनिक एकजूट, एकात्मता निर्माण करणारी ही नृत्ये आहेत. त्यात चपळाई असते. जलद हालचाली असतात. पारंपरिक रुढींशी आणि विधींशी या नृत्याचा संबंध असतो. त्यात मनोरे, पिरॅमीडस्, व्यायामाचे प्रकार अनेक पद्धतींचे खेळ असतात. बैठकीचे खेळ असतात. स्पर्धा आणि चुरस असते. काही नृत्ये शक्ती सामर्थ्याची तर काही शक्तीपेक्षा युक्ती श्रेष्ठ सूचविणारी असतात. कोडे घालून उलगडविणारी असतात. निसर्गाच्या सान्निध्यात ही नृत्ये असल्याने त्यात कोणत्याही प्रकारचा बंदिस्तपणा नसतो. वातावरण मुक्त असते. मने मोकळी असतात. पौर्णिमेची वा चांदणी रात्र असते. वेगळी कृत्रिम प्रकाश योजना करावी लागत नाही. आदिवासींनीच तयार केलेल्या विविध वाद्यांच्या प्रतिसादात स्वाभाविकपणे ही नृत्ये सादर होतात.

आदिवासींची 'करमा', 'बिहू', 'परब' इत्यादी नृत्ये प्रसिद्ध आहेत. निसर्गाला संतुष्ट करण्याचा त्यांचा हेतू असतो. 'बोहाडा' सारखी नृत्ये धार्मिक भावनेने सादर करतात. देवकृपा होते, पीकपाणी चांगले येते, शिकार मिळते ही श्रद्धा त्याच्या मूळाशी आहे. आदिवासींमध्ये जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या सगळ्याच संस्कारांशी संबंधित--संयोजित, नृत्ये आहेत. सण उत्सवात याचे प्रत्यंतर येते. होळी पौर्णिमेच्या सणाला आदिवासी त्यांच्या परंपरागत नृत्यगान उत्सवात धार्मिकता म्हणून, असतील तेथून गावी, पाड्यावर येतात आणि नृत्यसोहळा साजरा करतात. दिवाळी, आखाती, दसरा, मकरसंक्रांत, पोळा, नागपंचमी आणि बीजा या सणात नृत्ये सादर होतात. 'शुद्धातल्या पंचमी पासून वद्यातील चतुर्थी' हा कालावधी नृत्याला अनुकूल असतो. देवतांच्या आराधनेचे साधनही नृत्यच असते आणि आनंदाच्या प्रसंगात नृत्याला वाव असतो. नृत्याचा उगमच देवापासून त्यांनी मानला. 'नारनदेव', कनसरी देवीने कोंबडनाच, बडादेवाने 'राजनेरीबाना' परधानांना सांगितला. भिवसनदेवाचा 'दंडार'. तात्पर्य – ईश्वराला ही लोकनृत्ये समर्पित असतात. 'तारपा' वाद्यही देव्हाऱ्यात इतरवेळी ठेवतात. आदिवासी नृत्याचे शौर्य वीरश्रीयुक्त नृत्ये, धार्मिक स्वरूपाची नृत्ये आणि सांस्कृतिक, ऋतु मानाप्रमाणे सादर होणारी नृत्ये असे तीन प्रकार मानलेले आहेत. विशष्ट देवदेवता, झाड – वृक्ष बळीचा पशू यांच्या भोवती हे धर्मनृत्य करतात. 'डिंडण', 'गावबांधणी', 'भिवसन पूजा' अशी ही नृत्ये सादर होतात. आदिवासींच्या वेगवेगळ्या जमातींचे वेगळेपण लक्षात आणून देणारी ही नृत्ये असतात. 'भिल्ल' धरतीपूजा 'डिंडण' नाचात बांधतात. 'कोलम' दिवाळीत 'दंडार' करतात. दंडरात पहिले नमन मारुतीला असते. तसेच 'टेमसा' हे जागरूक नृत्य आहे. 'करसाड', 'मरकी' नाच मृतात्म्यासाठी असतो तर करमणूकीसाठी रेव्हॉ, सोंगाडी, गंमत, झगडः हे नृत्य प्रकार आहेत. टिपऱ्या, मांदोळ – ढोल, कांबड असे विविध नाचाचे प्रकार आहेत. झगा, फेरा, गदा, तलवारी, लेहंगा, चाळ, घुंगरू अशी वेशभूषा परिधान करून नृत्य सादर होते. होळी-पौर्णिमा, धूलिवंदन झाले की 'बोहाडा' उत्सवाची तयारी होते. आदिमाता जगदंबा तिचा हा उत्सव, विविध मुखवटे घालून सोंग

नाचवून तो साजरा होतो. संबळ, तुतारी, सूरवाद्यांच्या तालात देवदेवता व इतर अशी मिळून ३०/४० सोंगे, स्वीकृत अवतारानुसार, वेगवेगळ्या पद्धतीने नाचून मिरवतात. सोंगानुसार नृत्याची चाल आणि वाद्यांची आतषबाजी असते. छोटेखानी स्वरूपात त्या गावात यात्राच या बोहाड्याच्या निमित्ताने भरते. गणपती, बहिरोबा, हिरवा देव, जगदंबा असे मुखवटे असतात. 'बोहाडा' लोकनृत्य माध्यमातून केलेली श्रद्धायुक्त करमणूक असते. त्यामुळे आदिवासींना नवा हुरूप येतो. नवी उभारी आणि उमेद येते. 'तारपा' हे आदिवासींचे अत्यंत लोकप्रिय नृत्य आहे. 'काठ्या' त्याच्या काठीला घुंगर असतात, यालाच 'म्होरक्या' किंवा 'मांदोळ्या' असेही म्हणतात. त्याच्या सूचक हालचाली, इशाऱ्याने तालबद्ध फेर धरून नाचतात. स्त्री – पुरुषांचे पदन्यास विलोभनीय असतात. तारपा वाजवणारा दमदार, ताकदवान गडी लागतो. तरुणींनाही तो आवडतो. बेहोषी आणि धुंदीचा आगळा अनुभव 'तारपा' नृत्यात येतो. म्हणून 'बर्ट्रांड रसेल' सारखा तत्त्ववेता म्हणतो की, 'तुमची ही बेहोषी माझ्या वाट्याला आली तर मी माझे सगळे तत्त्वज्ञान आणि ग्रंथ आदिवासींना अर्पण करायला तयार आहे.' त्याचप्रमाणे 'पावरी' नृत्यात लांब वक्राकार भोपळा, बासऱ्या बैलाचे शिंग, मोरपिसे यांचे 'पावरी' वाद्य तयार केले जाते. आदिवासी पावरीला देवासमान मानतात. पावरीचा सुमधुर सूर, टाळ्यांचा नाद, खरारा, काठ्यांची घुंगरे आणि पावलांचा ताल या ध्वनिमेळात हा नृत्याविष्कार होतो. त्यात कृष्णावतार स्वरूप एकजण 'खुट्या' असतो. मावल्यांना सांभाळणे, दिशा दाखविणे हे त्याचे कार्य. मोरपिसाचा कुंचा हाती घेऊन तो नृत्यातील दिमाख सावरतो. चुका करू देत नाही. 'वरल्या माळीला उन्ह्या पावा वाजव वं, उन्ह्या पावा वाजव वं' 'रंग दिला व दिला शेंदवड गौळाला वं शेंदवड गौळाला' पावरीच्या सुरात अशी ही गाणी गात लयबद्ध नृत्य सादर होते.

<u>लोकनृत्य कलेचे जतन आणि संवर्धन :–</u>

यापुढील काळात आता आदिवासी समाज हा आदिम, वननिवासी, गिरीजन राहणार नसून तो ग्रामीण जीवनात सामावला आहे. नागरी जीवनाकडे त्याची वाटचाल आहे. सुशिक्षित व आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी होऊ पाहतो आहे. त्यामुळे हा आदिवासी लोकनृत्य कलेचा ठेवा कसा जतन केला जाईल? आणि त्याचे संवर्धन कसे होईल? याची काळजी आहे. तथापि आदिवासी समाजांची प्रगती अवश्य व्हावी पण त्यांच्यात परंपरेला जे प्राधान्य आहे; त्यानुसार त्यांना ती जतन कराविशी वाटेल, तिचे ते संवर्धन करतील अशी अपेक्षा आहे.

नोकरी – मजुरीनिमित्त जरी ते आपापल्या पाड्यापासून दूर असले तरी कोणत्याही परिस्थितीत शिमग्याला ते नफा–नुकसानीचा विचार न करता हमखास पाड्यावर गावाकडे मोकळं नाचण्यासाठी, हुंदडण्यासाठी परततातच.

आदिवासी जीवनातील या लोकनृत्य कलेचे, तिच्या उच्च दर्जाचे स्थान अबाधित राहण्यासाठी 'सुविधा' कलासंवर्धनासाठी उपलब्ध झाल्या पाहिजे. उदा. महोत्सव, लोकनृत्य सभागृह, वाद्य साज सामग्रीची उपलब्धी इ. आदिवासींच्या जीवनातील लोक संगीत–नृत्य हरपले तर ते जीवन निरानंद–भकास होईल. उलट त्यांच्या या लोकनृत्यकलेला संशोधनपूर्वक शास्त्रीय अभ्यासाची जोड लाभल्यास ही कला विकसित होईल. आदिवासींच्या आनंदाची परिसीमा ही लोकनृत्यकला आहे.

संदर्भ :–

१. भारतीय संस्कृति कोश (प्रथम खंड), संपादक : महादेवशास्त्री जोशी द्वि. आ. १९८२.

२. विश्वकोश खंड १ व २ प्रमुख संपादक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी.

३. आदिवासी कला : डॉ. गोविंद गारे व उत्तमराव सोनावणे, ग.म.भ.न. प्रकाशन पुणे प. आ. १९९३.

४. आदिवासी लोकरंगभूमी : डॉ. सुदाम जाधव, सुलबा प्रकाशन, औरंगाबाद २००४

५. आदिवासी स्त्रियांचे भावविश्व : सौ. सुमन मुठे, कीर्ती प्रकाशन, औरंगाबाद, २००६.

६. आरसा : आदिवासी जीवनशैलीचा : डॉ. भास्कर गिरीधारी, युगांतर प्रकाशन, नाशिक दु. आ. २००४










# 'वाट ही सरेना' आणि 'संध्याछाया' तौलनिक अध्ययन

## डॉ० रविंद्र भास्कर पाटील

प्रचलित जीवनप्रवाहातील दुःखपूर्ण घटना-प्रसंगांनी सर्वसामान्य माणूस व्यथित होत नाही असे नाही; परंतु त्याच्या प्रतिक्रियेला – प्रतिसादाला मर्यादा असतात. मात्र कलावंताची प्रतिक्रिया भिन्न असते. त्याच्या म्हणून तीव्रतर संवेदनशीलतेद्वारा अशा प्रश्नांकडे पाहण्यातून आलेले अस्वस्थपण, मनन–चिंतन यातून त्याची प्रतिभा काही निर्मिती–आकार शोधत असते. त्या परिस्थितीतील एकूण घालमेल; अस्वस्थपण यातून हे 'आकार' विशिष्ट 'घाट' घेऊन अनेकानेक दिव्यानुभवातून जात जात कलावंताला अपेक्षित 'रूप' घेऊन अवतरतात. साहित्यिकाच्या संदर्भात 'भाषिक रूपात' अवतरलेल्या ह्या रूपास आपण कथा, कादंबरी, नाटक अशी पारंपरिक अनुषंगिक नावे प्रदान करतो. थोडक्यात कलावंताच्या प्रातिभिक मनोव्यापाराच्या असंख्य टप्प्यांतून अनुभूती स्वतःच विशिष्ट रूप घेऊन आकारित होत असते.

भाषिक रूपात अवतरलेल्या विशिष्ट प्राकारिक रूपाबद्दल, कलावंताच्या एकूण प्रतिसादात्मक रूपाच्या 'प्रत्यक्ष अवतरणाबद्दल' त्याच्या पूर्ण अपेक्षांचे समाधान त्याला मिळतेच असे होत नाही. अवतरलेल्या भाषिक रूपातल्या एखाद्या घटकाबद्दलची त्याला भासत असलेली अपूर्तता अंतर्यामी त्याला अस्वस्थ करत राहतेच. या अस्वस्थतेसह अनुषंगिक मनोभूमिकेतूनच त्याच अनुभवाचे रूपांतर अन्य साहित्यप्रकारात घडून येते. कथा – कादंबरी – नाटक अशा दिशेने वा साहित्यिकाच्या अपेक्षेत कोणत्याही दिशेने एकाच अनुभवबीजाचे अनेक रूपांतील हे आविष्कार मराठी साहित्यातही उपलब्ध आहेत. जयवंत दळवी यांचे नाव प्रामुख्याने या संदर्भात घेतले जाते. प्रचलित व्यवस्थेतील व्यक्तीच्या मानसिक घालमेलीसह निर्माण झालेल्या समस्यांच्या व्युहात्मक परिस्थितीचा वेध त्यांनी आपल्या साहित्यातून सतत घेतला. ह्या बाह्य परिस्थितीच्या दबावातून व्यक्तिमनात निर्माण झालेले तणाव तथा या परीस्थितीत त्याचे जगणे या दोघांतील संगती-विरोध हे जयवंत दळवी यांच्या साहित्यातून सतत आवृत्त होत राहिले. त्यांच्या कथा-कादंबरी नाटकादि ललित साहित्यातून उपरोक्त लक्षणीयता सहज दृष्टीगोचर होते.

ललित गद्य साहित्यात भरपूर लेखन दळवींनी केलेले आहे. त्याचबरोबर 'वाङ्मयरूपांतरणे' ही दळवींनी खूपच केलेली आहेत. तीन वेगवेगळ्या रूपातील बॅरिस्टर (कथा – लघुकादंबरी – नाटक) (अपूर्णांक – कथा – नाटक) असे प्रयोग या दृष्टीने निर्देशिता येतील.

'संध्याछाया' या त्यांच्या गाजलेल्या नाटकाचा या दृष्टीने शोध घेतला तेव्हा त्यांची 'वाट ही सरेना' ही लघुकथा हाती लागली. प्रस्तुत लेखनातून 'वाट ही सरेना' मधील कथानुभव 'संध्याछाया' मध्ये 'नाट्यरूप' घेताना काय 'बदल' घडलेत इ. तौलनिक दृष्टिकोणातून अभ्यासावयाचे आहे.

विज्ञानामुळे मानवी जीवन सुखी व समृद्ध झाले. कालसंवेगबद्ध अशा ह्या गतिशील जीवनाने समृद्धीच्या दिशा स्वतः शोधून संपादन केल्या. वरवर पाहता भौतिकसुखसमृद्धीची ही रेलचेल मानवी जीवन सुखमय करीत आहे; पण आत–अंर्तमनात असमाधान आहे; अशांती आहे. स्वमनावर लादलेल्या अपेक्षांच्या ओझ्यातून, त्यांच्या अपूर्ततेतून दुःखाचे गहिरे रंग अंतःकरणावर पसरत जातात. बऱ्याचदा हे दुःख आणि अंतःकरणावरील त्याच्या दाबासह माणसं वाट्याला आलेलं जगणं जगत राहतात. किंवा जगणं असह्य होऊन हताशेनं जीवनाचा अंतही घडतो वा असह्य दुःखाच्याच दाबातून मानसविश्वच हादरून विकृतीही जन्म घेतात. व्यक्तिगत वा समुहरूपातील अशा मानवीय जगण्यातील असहनीय दाबांचे, प्रश्नांचे आवर्त; त्यांच्यातील ताण – तणाव संवेदनशील मनावर 'प्रभावात्मक' क्रिया घडवून आणतात. साहित्यकृती अशा प्रभावांचे प्रकटरूप धारण करतात. मानवी आयुष्यातीलच दीर्घकालीन जगण्यातून

अपरिहार्य अशा संधिकालीन सावल्यांची–वार्धक्याची करूण रूपे तथा तद्नुषंगिक समस्यांचे व्युहसुद्धा प्रभावरूपाने साहित्यकृतींच्या निर्मितीला कारणीभूत ठरतात. जागतिक रंगभूमीवरील एक सुप्रसिद्ध नाट्यकृती -- (शेक्सपीअरच्या 'किंग लिअर'च्या प्रभावातून) वि.वा.शिरवाडकरांचे 'नटसम्राट' सुद्धा उपरोक्त समस्याव्युहाचाच प्रभाव धारण करते. एक प्रयोगशील प्रतिभावंत म्हणून उपरोक्त प्रभावांच्या अनुसरणातून मुंबईसारख्या महानगरीय 'जगण्यातील' कनिष्ठ मध्यमवर्गीय माणसांच्या 'समस्या' आपल्या साहित्यातून दळवींनी विविध परींनी मांडल्या. 'वाट ही सरेना' ही त्यांची कथा व 'संध्याछाया' हे नाटक उपरोक्त प्रभावाचीच प्रतिरूपे होत.

ऑक्टोबर १९७४ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'स्पर्श' ह्या कथासंग्रहात 'वाट ही सरेना' ही कथा समाविष्ट आहे तर 'संध्याछाया' हे ९ डिसेंबर १९७३ रोजी रंगमंचावर 'प्रथम प्रयोग' म्हणून प्रदर्शित झाले. त्याची लिखित आवृत्ती (पहिली) मार्च १९७४ मधील आहे. कथासंग्रहात 'वाट ही सरेना' ही कथा प्रथम कोठे प्रसिद्ध झाली व केव्हा प्रसिद्ध झाली याची नोंद नाही, परंतु कथासंग्रहात समावेश होण्यापूर्वीचीच ती कथा आहे, व नाटकापूर्वीची आहे; हे सहज समजण्यासारखे आहे. 'वाट ही सरेना' मध्ये कृष्णराव आणि राधाबाई यांच्या आयुष्यातील नेहमीसारखा कंटाळवाणा दिवस. वेळ 'घालवायचा' कसा ही चिंता. कॅलेंडरचं पान फाडणे, चिमणीची पीसं बाहेर फेकणे अशा गोष्टी ते करू पाहतात. खालच्या घरातला 'संजीव' सुद्धा त्यांचा विरंगुळाच आहे; पण कोण जाणे आज तो सुद्धा येत नाही. विमान अपघातात मुलगा माधव मेलेला आहे. त्याच्या आठवणी दोघांनाही दुःख देतात. रस्त्यावरून जाणारी वरात दोघेही न्याहाळतात. कृष्णरावांना स्वतःच्या लग्नातील 'लफ्फलेदार शालूतली राधाबाई' आठवते. माधवाच्या वरातीचं स्वप्न प्रत्यक्षात उतरलेलं नसतं. दोघेही पुन्हा दुःखी होतात. स्वयंपाकघरात दूध तापवण्यात वेळ घालवतात. रस्त्यावरून पुन्हा वाद्यगजर होतो. ती दिंडी असते पण त्यांना प्रेतयात्रा वाटते. असा 'कसाबसा' दिवस संपतो. एकमेकांना झोपी जायचा आग्रह करीत झोपेचं सोंग घेऊन दोघंही पडून राहतात.

'संध्याछाया'– अंक पहिला – नाना व नानी, एक वृद्ध जोडपे आहे. 'वेळ घालवणे' ही दोघांपुढे समस्या. बारिक – सारिक कामे करू पाहतात परंतू महादू ती आधीच करून टाकतो. दोघांनाही अपत्ये तशी तीन; परंतु त्यातील मालू मृत्यू पावलीच. दोघा मुलांपैकी मोठा दिनू अमेरिकेत आहे, तर नंदू लष्करात आहे. दिनूने परदेशी न राहता देशात आपल्याजवळ रहावे असे त्यांना वाटते, वेळ घालवण्याच्या 'उद्योगांतच' 'रॉंग नंबर' वर ही नाना बोलत राहतात. 'शर्मीला' ही गोड मुलगी यातून 'लाभते'. नाना तिचे 'आजोबा' होतात. नंदूचं पत्र येतं. बाकरवड्या मित्रांबरोबर खाल्ल्या, त्याला आलेल्या दिनूच्या पत्राचा उल्लेख खोडलेला. दिनूनं अमेरिकेत परस्पर लग्न केलं की काय अशी शंका दोघांच्या मनात येते. तेवढ्यात 'विनय' पत्ता चुकून नाना–नानीपर्यंत येऊन पोहोचतो. त्याच्याशी बोलत वेळ घालवतात. त्याला लग्नाची बहीण आहे हे ओघात कळते. भाबडे नाना नंदूसाठी तिला मागणी तर घालतातच, परंतु विनयला आपल्याचकडे पेईंग गेस्ट म्हणून रहाण्याचा आग्रह करतात. वाट चुकून आलेल्या, भांबावलेल्या विनयला पुन्हा वर ताण म्हणून आम्ही कुणी मेलो तर चार लोक जमवायला तूच कामी येशील म्हणून आग्रहही करतात. विनय 'त्यांच्या' तावडीतून सूटतो. रस्त्यावरून जाणाऱ्या वरातीत दोन्ही नटून – थटून जायला बघतात. न्युयॉर्क वरून दिनूचा निरोप व पैसे घेऊन शाम देशपांडे येतो. त्याच्याकडूनच दिनूने अमेरिकेत लग्न केल्याचं कळतं आणि दोघांच्या भाबड्या स्वप्नांवर पाणी फिरतं. प्रचंड दुःख होतं. एकमेकांना जपण्यापलीकडे काही करू शकत नाहीत. विनय फोनवरून तो मामाकडे राहतो आहे हे सांगतो; तोच पुन्हा नानांच्या मागणीप्रमाणे दिनूबद्दल विचारतो; नाना पटकन फोन ठेवतात. नंतर नंदूकरता तिला पाहण्यासाठी राजी होतात. म्हादूजवळ नेहमीच्या झोपेच्या गोळ्यांकरीता पैसे देतात. घरी येण्यासाठी निघालेल्या नंदूची रजा पाकिस्तान युद्धामुळे रद्द होते.

अंक दुसरा – चिंताग्रस्त नाना वेळ घालवू पाहतात. विनय नंदूच्या स्थळाबद्दल स्वाभाविक घाईसह नानांना विचारतो. पण युद्धामुळे नाईलाज आहे. युद्ध थांबेपर्यंत वाट पाहणे अटळ आहे. दिनूच्या थाटामाटाच्या लग्नाची स्वप्ने आता नंदूत संक्रमित झालीत. दोघेही

भूतकाळात रमतात. दिनूला भारतात – त्यांच्याजवळ येण्याचा आग्रह करतात. त्याचा नेहमीप्रमाणे नकार कायम आहे. स्वप्नात नानी वधूवेशात; तेवढ्यात रस्त्यावरून प्रेतयात्रा जाते. जाग येऊन प्रचंड घाबरून नानी नानांजवळ जातात. तर नानांनाही नंदूच्या वरातीचं स्वप्न; तेव्हढ्यात तारवाल्याची आरोळी. नंदूच्या मृत्यूची भयंकर आघातक बातमी. स्वप्नांची राखरांगोळी. तीव्र दुःखाचे आरपार भेदणारे दाहक चटके. दिनू शोकप्रत भारतात येतो. बायकोही सोबत परंतु ती हॉटेलात आहे. नानांचा नेहमीप्रमाणे त्याला आग्रह; त्याचा नकार, कायम दोघांचे भांडण. दोन पिढ्यांतील मता-मतांचा फरक आहे. नानी समजूत घालते. त्याला अमेरिकेत जाण्यापूर्वी सकाळी घरी यायला आग्रह करते. पुत्र म्हणून दोघांच्या मरणानंतरची व्यवस्था त्यालाच करावी लागेल; मुलगा झाला तर त्याला नानांच नाव ठेवण्याचा आग्रह धरते. मनःपूर्वक आत्महत्येचा निर्णय घेऊन दुधात झोपेच्या गोळ्या टाकून ते दूध दोघेही पितात. खुर्चीतच ज्ञानेश्वरी वाचतच 'झोपी' जातात. दिनू दार ठोठावत राहतो.

कथा नाटकातील साम्य – भेद

१. रोगजर्जर वृद्धावस्था व त्यासह एकमेकांवर खूप जिवापाड प्रेम व निष्ठा असणारे जोडपे, दोन्हीही ठिकाणी आहेत. कथेतून कृष्णराव-राधाबाई; पारंपरिक राधा-कृष्णाच्या अद्वितीय प्रेमाची प्रतिक असलेली नावे; तर नाटकातून नाना-नानी या रूपात; नाना या पुलिंगी विशेषनामाचे स्त्रीलिंगरूप, अर्थात प्रतिकात्मक एकात्मता.

२. असह्य कंटाळवाणे दिवस; जेथे वेळ घालवायचा कसा ही चिंता कथा व नाटक दोन्ही ठिकाणी समान आहे.

३. वेळ घालवण्याचे एक साधन म्हणून कॅलेंडरचे पान फाडणे – दोन्ही ठिकाणी समान, मात्र कथेतून कृष्णराव हे करायला बघतात तेव्हा राधाबाई, व नाटकातून नाना पान फाडू बघतात तेव्हा नानी पान फाडतात.

४. त्याचप्रकारे चिमणीने टाकलेली काडी उचलायला बघणं; दोन्ही ठिकाणी 'पुरुष' पुढे सरसावतात; दोन्ही ठिकाणी स्त्रियांचा नकार. छपराला आकाराला येत असलेलं चिमणीचं घरटं या घटिताची प्रतिकात्मक उपयोजने दोन्हीकडे. नाटकात अर्थात त्याला दृश्यरूप. सृजनाविष्कार वेदनेतून सुख देणारा पण इथे कथा व नाटक दोन्ही ठिकाणी 'पाखरं' उडून गेलेली आहेत. तरीही चिमणीच्या घरट्यातून का होईना मनावर 'फुंकर' घालण्याचा व्यर्थ प्रयास.

५. रस्त्यावरून वरात जाणे.

वरात प्रसंगात कथेत दोन्हीही वेळ घालवतात. वरातीतल्या स्त्रियांच्या लफ्फेदार शालूंमुळे कृष्णरावांना लग्नातल्या राधाबाई आठवतात. पण दुःखी होतात. नाटकातून दोन्ही अंकात वरातींचे संदर्भ आहेत. पहिल्या अंकात दिनूच्या लग्नाचं 'स्वप्न' डोळ्यासमोर तरळत असल्याने दोन्हीही 'सजून' गॅलरीत उभे राहतात. दुसऱ्या अंकात नंदूच्या वीरमरणाआधी स्वप्नातून वरातीचे दृश्य. मरणाच्या दुःखाची तीव्रता वाढवणारा प्रसंग म्हणून वापर केलेला आहे.

६. कावळा ओरडणे.

दाराशी कावळ्याची काव-काव हा पाहुणे येण्याचा संकेत. कथेत, कावळा ओरडल्यानंतर कोणीही येणार नाही; येण्यासारखे दोघांनाही कोणी उरलेले नाही हे माहित असूनही कोणीतरी येईल अशी अकारण आशा व त्यातूनच अपरिहार्य असा दुःखाचा आठव होतो. नाटकातून कावळा ओरडल्यानंतर नंदूचं पत्र किंवा दिनूचा फोन येईल ही आशा. नंदूचं पत्र येतं ही; पण आधी शर्मिलाचा फोन येतो. नंतर पुन्हा कावळा ओरडल्यानंतर नानीला दिनू येण्याची आशा वाटतेच. परंतु त्याआधी नंदूच्या मरणाच्या बातमीच्या आघाताने दोघांवरही अक्षरशः आभाळ कोसळलेले असते.

७. दिंडी.

कथेतून अखेरच्या प्रसंगी रस्त्यावरून जाणारी दिंडी राधाबाईंना आधी प्रेतयात्राच वाटते व साहजिक त्या भितात; परंतु ती दिंडी आहे हे कळल्यानंतर त्यात जावसं वाटतं, पण पाय हत्तीरोगानं सुजलेत. अखेर विषण्णपणे झोपी जाण्याचा व्यर्थ प्रयास नाटकातूनही. अखेरच्या प्रसंगी रस्त्यावरून जाणाऱ्या दिंडीचा आवाज. नानी आधी भितात नंतर मात्र आत्महत्येचा निश्चय मनाशी पक्का करतात. दोन्ही ठिकाणी दिंडीचा प्रतिकात्मक वापर मृत्यू सूचक असा आहे.

८. रक्ताचं नातं नसलेली पण ह्या दुःखी वृद्धांना थोडातरी विरंगुळा देणारी पात्रे. कथेतून 'संजीव' परंतु अप्रत्यक्ष उल्लेख, नाटकातून शर्मिला व विनय; प्रत्यक्ष आहेत.

९. शोकात्म अखेर

कृष्णराव आणि राधाबाई यांना रोजचं जगणं हीच एक शिक्षा झालेली आहे. असहनीय कंटाळवाणा दिवस कसाबसा ढकलून पुन्हा रात्री झोपण्याचा निष्फळ प्रयत्न करणं हाच त्यांचा दिनक्रम झालेला आहे. नाटकातून ह्याच दुःखपूर्ण जगण्याचा शेवट आत्महत्येला प्रवृत्त करून होतो. कथा व नाटक दोन्ही ठिकाणी शोकात्म अखेर आहे.

१०. पुत्रमृत्यू

कथेतून माधवचा मृत्यू आधीच झालेला आहे. नाटकातून नंदूचा वीरमृत्यू घडला आहे.

११. कथेतून कृष्णराव व राधाबाई आणि त्यांच्या मानसविश्वाला अधिकाधिक साकार केलेले आहे. नाटक ह्याच कथेची रंगावृत्ती असल्याने 'नाट्यांचे' परिणाम साधण्याकरीता आवश्यक ती पात्रे वाढतात.

एकूण, आयुष्याच्या प्रदीर्घ अशा असहनीय कंटाळवाण्या संधीकालीन सावल्यांची भीषणता कथानुभवातून साकारल्यानंतर तोच अनुभव अधिक परिणामकारक स्वरूपात - दृश्य स्वरूपात साकारताना शोकाचा परिघ वाढवून दळवी यांनी त्यांना अभिप्रेत जीवनाशय व्यक्त केला आहे व त्यात ते यशस्वीसुद्धा झालेले आहेत.

❋❋❋

---

परीक्षण लेख

# अतीताची लेणी

## डॉ० सु० र० देशपांडे

'अतीताची लेणी' या काहीशा अपरिचित पण विषयानुरूप शीर्षकावरून लेखक आपणाला गतकालीन मागे घडलेल्या घटना व त्यांचे सामाजिक संदर्भ व स्थान, त्यांच्या मागील परंपरागत समजुती, अभिमान स्थळे यांचा अन्वयार्थ लावून निष्कर्ष काढणार, हे सूचित झाले होते. सद्यपरिस्थितीत फार मोठ्या प्रमाणावर इतिहासाचे विकृतीकरण आणि महापुरुषांचे अपहरण घडत आहे. समाजाची इतिहासविषयक मानसिकता फार भावनाप्रधान आणि संवेदनशील झाली आहे. इतिहास व पुरातत्त्व यांविषयी लोक अतिसंवेदनशील बनल्यामुळे केवळ, अलंकारिक अर्थाने नव्हे, तर अगदी अक्षरश: तोंड काळे करून घेण्याची इतिहासतज्ज्ञांवर – पुरातत्त्ववेत्यांवर वेळ येते; पण सतत डोक्यावर टांगती तलवार ठेवूनसुद्धा विधायकतेने आणि कल्पकतेने मर्यादित धारिष्ट्य दाखवून सत्यपरिस्थिती उजेडात आणता येते. त्याचे प्रत्यंतर म्हणजे 'अतीताची लेणी' हे पुस्तक होय.

डॉ. म. श्री. माटे यांनी हा धागा पकडून प्रस्तुत पुस्तकातील सतरा प्रकरणांतून भारताचे पुरातत्त्व, इतिहास व संस्कृती यांच्या संशोधनाची, त्या संशोधनाच्या फलिताची काय अवस्था आहे, याची मीमांसा प्रस्तुत पुस्तकात केली आहे. अर्थात ही सर्व प्रकरणे सलग एकटाकी लिहिलेली नाहीत, तर पूर्वी प्रसंगानुसार व्याख्यानाच्या निमित्ताने वा अन्य काही प्रसंगोपात्त घडामोडींच्या संदर्भात लिहिलेली आहेत. प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी लेखकाने आधारग्रंथ दिलेले आहेत.

'शिकविताना आणि शिकताना' या पहिल्या प्रकरणात लेखकाने आपल्या प्रदीर्घ अध्यापनाचा दाखला देऊन स्वत: शिकते राहिले आणि नवे संशोधन हाच व्यवसाय बनला, हे स्पष्ट केले आहे. इतिहास संशोधनाचा अट्टाहास कशासाठी असा प्रश्न उपस्थित करून ते म्हणतात "सत्य जाणून घेणे, वर्तमानाशी त्याची सांगड घालणे, समाजाचे आणि राष्ट्राचे मानबिंदू, जखमा आणि उणिवा समजून घेऊन भविष्याकडे दृष्टिक्षेप टाकणे, अशी ही साखळी असते." इतिहास ही भूतकाळाची कथा असली, तरी ती वर्तमानाची गरज असते. भारतात पुराणे, महाकाव्ये, कौटिलीय अर्थशास्त्रासारखे ग्रंथ, ताम्रपट, शिलालेख, नाणी, वास्तू व विविध उत्खनित अवशेष अशी वैविध्यपूर्ण ऐतिहासिक साधने आहेत; मात्र एकसमयावच्छेकरून या सर्व ज्ञानशाखांचा अभ्यास करणे अवघड आहे, ग्रंथबद्ध साधने आणि पुरातत्त्वीय अवशेष यांतून एक गोष्ट स्पष्ट होते, की संपूर्ण भारताचा इतिहास एकसूत्रात गुंफता येणार नाही. तसेच, आज राष्ट्रीय एकात्मता, धार्मिक सलोखा आणि सामंजस्य या गोष्टी अत्यंत निकडीच्या – आवश्यक झाल्या आहेत, याबद्दल दुमत नाही; परंतु त्यांना सदा–सर्वकाळ ऐतिहासिक पाठबळ मिळेलच, अशी स्थिती नाही. उलट आज अशी स्थिती आहे, की प्रत्येक भाषिक विभागाला, प्रत्येक धर्माला, जातीला व सामाजिक वर्गाला स्वतंत्र मानबिंदू आहेत. प्रत्येकजण स्वत:पुरते पाहतो आणि त्यानुसार आग्रही बनतो. म्हणून उदाहरणादाखल लेखक म्हणतात, "छत्रपती शिवाजी महाराज हे भारताचे, त्यातही सकल मराठी समाजाचे स्फूर्तिस्थान, दैवत आहे अशी भावना गेली शंभर वर्षे तरी महाराष्ट्रात नांदत होती; परंतु आता ते फक्त बहुजन – म्हणजे मराठा समाजाचे दैवत आहेत असे ठरवून, त्यांना सहाय्यभूत ठरलेल्या ब्राह्मणांची नावे 'नव्या' इतिहासातून हद्दपार करण्यात येत आहेत. शनिवारवाडा हे अठराव्या शतकातील मराठी सत्तेच्या वैभवाचे प्रतीक आहे, असे इतकी वर्षे समजण्यात येत असे; परंतु आता ते ब्राह्मणी वर्चस्वाचे प्रतीक ठरले आहे. त्यामुळे शनिवारवाड्याच्या भविष्यावर प्रश्नचिन्ह उभे केले जात आहे."

दुसऱ्या 'हा अट्टाहास कशासाठी' यात जुन्या वास्तूंच्या जतनासंबंधी काही विचार नि:संदिग्धपणे मांडून ऐतिहासिक दुर्गा किल्ल्यांकडे एकूण दुर्लक्ष होत आहे. या





संदर्भात त्यांनी शनिवारवाड्याच्या जतनासाठी स्वतः सुचविलेल्या योजनांची दखल कुणीही फारशी घेतली नाही, हे दाखवून दिले आहे. 'अगा जे जालेचि नाही' या पुढील प्रकरणात त्यांनी दिल्लीतील जवाहरलाल नेहरू विद्यापीठातील तथाकथित इतिहासतज्ज्ञांनी जातिधर्मनिरपेक्षतेच्या तत्त्वावर जगातील सर्व धर्मांच्या संस्थापकांविषयीच्या जन्मकहाण्या सबळ पुराव्या अभावी कशा दंतकथा ठरविल्या आहेत, हे उपहासगर्भ भाषेत आणि थोड्या तिटकाऱ्यानेच लेखक मांडत आहेत. रामायण, महाभारत, हरिवंश तसेच रामचंद्र, श्रीकृष्ण यांविषयी माहिती देणारी साधने दुय्यम, तिय्यम दर्जाची आहेत म्हणून या जे.एन.यू. च्या विद्वानांनी ती अविश्वसनीय ठरविली आणि टोकाचे निष्कर्ष काढले, असे माटे सांगतात, मात्र त्याविषयी स्पष्ट मत देत नाहीत; फक्त पुराणे, धर्मगुरू, तत्संबंधीची शिल्पे वा शिल्पकार ह्यांविषयी प्रत्यक्ष साक्षीदार वा पुरावा नसल्यामुळे ती सर्व माणसे अनैतिहासिक होती, असे नाइलाजाने इतिहासकारांना म्हणावे लागणार? माटे यांनी 'आंधळ्यांची माळ,' 'असेही काही पिल्टडाऊन' आणि 'हिमनगाचे टोक' या अनुक्रमे तीन प्रकरणांत सिडनी टॉय यांच्या चुकीच्या नकाशाचे (देवगिरी) अंधानुकरण व्हर्जिनिया फास आणि बेगडे यांनी किल्ल्यांवरील आपल्या पुस्तकांत केले आणि पूर्वी इंग्रजीच्या अज्ञानामुळे इबीडसाहेब असे लिहिणाऱ्यांची आठवण करून दिली. थोडक्यात संशोधन क्षेत्रातील हा एक अंधानुकरणाचा जुना रोग आहे. त्याला Indirect referencing system virus म्हणतात; असे काही पुरातत्त्वज्ञ एखाद्या जुन्या वास्तूचे पर्यटनाच्या दृष्टीने सुशोभिकरण करण्याच्या हव्यासापोटी तेथील प्राचीन इतिहासाच्या खुणाच नष्ट करतात. हे 'असेही काही पिल्टडाऊन' या प्रकरणात 'ऐहोळे' या मंदिरनगराच्या उदाहरणाद्वारे मांडले आहे. याशिवाय सांची, तंजावर यांची स्थितीही फारशी निराळी नाही, हे त्यांनी दर्शविले आहे. हाच विषय त्यांनी 'हिमनगाचे टोक' यात भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाच्या काही अतिउत्साही अधिकाऱ्यांनी 'नव्हत्याचे होते' कसे करून दाखविले, याची कथा आहे; या प्रकरणात रुद्रमाळ किंवा रूद्रमहालय या मध्ययुगीन मंदिराची करूण कहाणी डॉ. माटे यांनी अतिशय ओघवत्या कथात्मक पण मनोरंजक शैलीत गोयल सिताराम, हेन्री कझीन्स आणि नागराजराव यांच्या वृत्तांचाच आधार घेऊन मुस्लिम धर्ममार्तंडांनी मूळच्या हिंदू मंदिराच्या जागी मशीद कशी बांधली, ती सिद्धपूरच्या रूद्रमाळ मंदिरातील अवशेषांचा उपयोग करून आणि मूळ मंदिर पहिला अहमदशहा या गुजरातच्या सुलतानाने पाडून ही मशीद कशी त्या स्थळी बांधली, त्याचा उल्लेख 'मिरात ए – सिकंदरी' या बखरीत आहे आणि आता अल्पसंख्य आयोग आणि मशिदीचे विश्वस्त तेथील उत्खनन, संशोधन यांत शासनाद्वारे अडथळे कसे आणत आहेत, हे विस्तारपूर्वक दाखविले. एकूण धर्मांधतेपुढे सत्ता धीटपणे उभी राहात नाही. स्वतंत्र भारतातील प्राचीन संस्कृतीच्या संशोधनाची ही एक करुण कहाणी आहे. हा लेख मूळातूनच वाचावा लागेल!

'विमानविद्या – कल्पनेतील आणि वास्तवातील' या प्रकरणात डॉ. माटे यांनी 'काही मंत्री म्हटले की यंत्रे चालत, तर ते विज्ञान नव्हे. जे व्यक्तिनिरपेक्षरीत्या सिद्ध होऊ शकते, ते विज्ञान. इतर सगळा कल्पनाविलास!' हे तत्त्व सांगून प्राचीन विमानाची संकल्पना भोंगळ असल्याचे सांगून 'आकाशयान आणि त्यासारख्या यंत्र घडणीविषयी आम्ही अजाण होते हे खरे' हे सोदाहरण प्राचीन वाङ्मयाचा आढावा घेऊन विविध उदाहरणांचे दाखले देऊन मांडलेले अनुमान आहे.

'नरसिंह' आणि 'गजथर' हे शिल्पाधिष्ठित दोन लेख डॉ. माट्यांच्या खास आवडीचे — व्यासंगाचे विषय असल्यामुळे त्यांतून भारतातील या दोन ज्ञापकांच्या मूर्तींची माहिती मिळते. दुष्टांचा संहार आणि सज्जनांचा प्रतिपाळ हीच या सर्व अवतारांची मुख्य प्रेरणा आणि हेच कारण आहे, असे नरसिंहाच्या शिल्पाबाबत म्हणतात. 'गजथर' म्हणजे हत्ती, हे वैभवाचे निदर्शक असल्याने त्याच्याकडे 'गजान्तलक्ष्मी' आहे या भावनेने हे शिल्पांकन सर्व मंदिरांतून, बौद्ध गुंफा – विहारांतून केले आहे.

'भगीरथ पुन्हा केव्हा येणार', 'युगान्त', 'पुरातत्त्व की भारतीय पुरातत्त्व', 'सम्राट अशोकाचा धर्मघोष' 'यादवी' आदी प्रकरणातून विविध सामाजिक – भौतिक विषयांवर प्रकाश टाकला आहे. पाणी मिळविण्यासाठी माणसाने व्यक्तिगतरित्या आणि

सामूहिकरित्या केलेल्या विविध प्रयत्नांची इ.स.पू. चौथ्या शतकापासून आजवरची ही कहाणी 'भगीरथ पुन्हा केव्हा येणार' या प्रकरणात अनेक ऐतिहासिक दाखले देऊन लेखकाने मांडली आहे. 'युगान्त' ही कल्पना काही विशिष्ट वर्गापुरतीच सार्थ आहे, हे लेखकाने अनेक कालगणनांची उदाहरणे देऊन सांगितले आहे. 'पुरातत्त्व की भारतीय पुरातत्त्व' या प्रकरणात लेखकाने पाश्चात्त्यांच्या प्रयत्नातून आलेल्या शास्त्रशाखेचे भारतातील कार्य पाहता 'पुरातत्त्वज्ञांनी वैदिक, आर्य, कुरू, यदू, इक्ष्वाकू यांचे जड अवशेष मिळविलेच पाहिजेत, असा अट्टाहास लोकमानसातून आढळून येतो. 'सम्राट अशोकाचा धर्मघोष' हे चाणाक्ष राजाचे समाजकारण आहे, अशोकाने या मतप्रणालीचा मतपरिवर्तनासाठी अतिशय हुशारीने उपयोग करून घेतला. म्हणूनच त्याने या धर्माज्ञा प्रसृत केल्या. 'यादवी'चे विश्लेषण लेखकाने काही ऐतिहासिक उदाहरणे देऊन, विशेषतः रामचंद्र यादवाचे, हा दोष स्पष्ट केला आहे.

'सत्तांतर' आणि 'भगवद्गीतेचा सामाजिक अन्वय' ही दोन प्रकरणे सत्ताधीशांच्या मानसिकतेचा ठाव घेणारी आहेत. 'सत्तांतर' या प्रकरणात लेखकाने इस्लामी सत्ताधारी आणि मराठे सत्ताधारी यांच्या प्रवृत्तीची सत्तालालसेची सत्यान्वेषणात्मक तुलना केली असून इस्लामी कालखंडातील रक्तपात, विश्वासघात आणि क्रौर्य या संदर्भात अल्लाउद्दीन खलजी, औरंगजेब यांची उदाहरणे दिली आहेत; तर छत्रपती शिवाजी महाराज, पहिला बाजीराव, पहिला माधवराव यांचा सहिष्णू दृष्टिकोण सांगितला आहे.

एकूण 'अतीताची लेणी' हे पुस्तक लेण्यांच्या नावाखाली भारतातील विविध संशोधनात्मक ऐतिहासिक, सामाजिक, धार्मिक व परंपरागत रूढी – चालीरीती आणि तत्संबंधीची सामान्य लोकांपासून – सत्ताधाऱ्याची मानसिकता यांचे दर्शन घडविणारी एक मार्मिक विवेचनात्मक लेखमाला आहे. स्वतः लेखक पुरातत्त्वज्ञ, संशोधक आणि बुद्धिप्रामाण्यवादी इतिहासकार असल्यामुळे त्यांचे विवेचन तर्कशुद्ध, काहीसे परखड पण सुसंगत असे झाले आहे. कथात्मक निवेदन शैलीमुळे गंभीर विषयसुद्धा सलग वाचत जावा, असे वाटते.

**अतीताची लेणी** – डॉ. म. श्री. माटे, देशमुख आणि कंपनी पब्लिशर्स, प्रा. लि. पुणे, २००६; पृष्ठे २१३; मूल्य रू. २००/-

❖❖❖

# काल, आज आणि उद्या

# आपत्कालीन सहाय्याचे नवे आयाम

## साक्षी

पूर, अतिवृष्टी, अनावृष्टी, दुष्काळ, भूकंप, वादळे, साथीचे रोग, टोळधाडी अशा अनेक नैसर्गिक आपत्ती मनुष्य-समूहांना वेळोवेळी भोगाव्या लागतात. या नैसर्गिक आपत्तींप्रमाणेच लढाया, महायुद्धे, दंगे, वंशहत्त्या, दहशतवादी हल्ले, अतिरेकी घातपात या मनुष्यनिर्मित आपत्तींची शिकार होण्याचे दुर्भाग्यही काही प्रदेशातील समाजांच्या वाट्याला येते. गेल्या दीडशे वर्षांपर्यंत संपूर्ण मनुष्यजातीने अशा आपत्तींना बळी पडलेल्या लोकांना मदत केली पाहिजे असा विचार मनुष्याला सुचला नव्हता. सुमारे दीडशे वर्षांपूर्वी, १८५९ साली, सोल्फेरिनो येथे फ्रेंच सैन्य व ऑस्ट्रियन सैन्य यांच्यात रणकंदन झाले. सुमारे चाळीस हजार जखमी किंवा मृत माणसे रणभूमीवर पडली होती. त्यावेळी सोल्फेरिनोच्या जवळच्याच कास्टिग्लिओन या गावी आंर्रा ड्युनान्त नावाचा स्वित्झर्लंडमधील उद्योगपती फिरत फिरत आला होता. त्याला रणांगणावरील बळींची अवस्था पाहावली नाही. त्याने कास्टिग्लिओन मधील लोकांना एकत्र करून जखमींची शुश्रूषा, ते जखमी कोणत्या सैन्यात सैनिक होते याचा विचार न करता, करायला सुरुवात केली. 'सर्व माणसे भाऊ-भाऊ आहेत', ही घोषणा या परिचारक जथ्थ्यांची होती. आपद्ग्रस्तांची काहीशा पद्धतशीर रीतीने देखभाल होण्याचे हे पहिले उदाहरण होते. ड्युनान्तने या अनुभवावर पुस्तक लिहिले. त्याचा परिणाम होऊन युद्धातील जखमींची काळजी घेणाऱ्या 'रेड क्रॉस सोसायटी' या संस्थेची स्थापना १८६४ साली झाली.

इतक्या जुन्या काळी औषधे, शस्त्रक्रियेची साधने, मदत करणाऱ्या स्वयंसेवी जथ्थ्यांना आपत्तिस्थळी नेणारी दळणवळणाची साधने अशा सगळ्यांचीच वानवा होती. पण अशा आपत्तीच्या प्रसंगी भूतदयेने प्रेरित होऊन मानवतेच्या पातळीवरून बळींची मदत केली पाहिजे, ही कर्तव्यभावना लोकात निर्माण झाली ही महत्त्वाची गोष्ट होय.

त्यानंतर सुमारे ७० वर्षांनी, १९३१ साली, उन्हाळ्याच्या दिवसात चीनमध्ये अवकाळी धुवांधार पाऊस पडला. नद्या-नाल्यांना पूर आले. हा हाहा:कार माजलेला असतानाच एक प्रलय वादळ चीनच्या समुद्र-किनाऱ्यावर येऊन आदळले. त्यामुळे नद्यांचे समुद्राकडे वाहणारे पाणी मागे हटले. चीनच्या मैदानी भागात नद्यांचे किंवा कालव्यांचे पाणी पसरू नये म्हणून काठावर भिंती किंवा बंधारे बांधले होते. ते कोलमडून पडले आणि सारा प्रदेश पाण्याखाली बुडाला. त्या प्रलयातून वाचले कोण, ते कुठे आहेत व त्यांच्यापर्यंत पोचायचे कसा असा प्रश्न चीनच्या सरकारपुढे होता.

सुदैवाने विख्यात वैमानिक चार्ल्स् लिंडबर्ग व त्याची बायको ॲन हे दोघे त्याच वेळी चीनची राजधानी नान्‌जिंग इथे आले होते. दोघे पट्टीचे वैमानिक होते आणि ४ वर्षांपूर्वी त्यांनी अमेरिकेहून युरोपकडे अटलांटिक महासागरावरून उड्डाण केले होते. दोघांनी त्यांच्या 'लॉकहीड सीरीयस' या प्रकारच्या विमानातून आपद्ग्रस्त भागाचे हवाई सर्वेक्षण केले. त्यांना असे आढळले की, जो अंदाज केला होता त्यापेक्षा केवढा तरी मोठा प्रदेश पाण्याखाली बुडाला होता. लक्षावधी पूरपीडित उंचवट्याच्या भागांचा आश्रय करून कसे बसे जीव धरून राहिले होते. हवाई सर्वेक्षण हे आपत्कालीन सहाय्यासाठी किती उपयोगी साधन आहे, हे तेव्हा लक्षात आले.

मानव-निर्मित उपग्रह पृथ्वीच्या सर्व पृष्ठभागावर कायमचा पहारा देऊ लागल्यापासून हवाई सर्वेक्षण या क्रियेचा चेहरा-मोहराच बदलून गेला आहे. या उपग्रहांच्या द्वारे आपत्तिग्रस्त भागाचे तपशिलवार व नेमके चित्र हाती येते. या चित्रांना संगणकाच्या सहाय्याने निर्माण केलेल्या 'भौगोलिक माहिती योजना' (जिऑग्राफिक इन्फर्मेशन सिस्टिम्स) (भौमायो)तून मिळणाऱ्या माहितीची जोड दिली की, आपत्तीचे बळी कोठे, किती व कोणत्या अवस्थेत आहेत, त्यांना कोणत्या मदतीची गरज आहे इत्यादी माहिती देणारा नकाशा काही मिनिटात तयार करता येतो. वाहातुकीची वेगवान साधने व संपर्काची सोयीची व्यवस्था हाताशी असल्याने आपत्तिग्रस्तांना तातडीने आणि परिणामकारक मदत करता येते.







अनुक्रमणिका

आपत्कालीन सहाय्यासाठी आंतरराष्ट्रीय पातळीवर संस्थांचे सुसंघटीत जाळे उभे राहिले आहे. संयुक्त राष्ट्र संघाने 'मानवी सहाय्य संघटन केंद्र' (ऑफिस फॉर को-ऑर्डिनेशन ऑफ ह्यूमॅनिटेरियन ॲसिस्टन्स) सुरू केले आहे. हे केंद्र कोठेही आपत्ती उभी राहिली की त्या ठिकाणी 'सहाय्यता माहिती केंद्र' (ह्युमॅनिटेरियन इन्फर्मेशन सेंटर म्हणजेच एच्.आय्.सी.) सुरू करते. मदत-कार्यात भाग घेणाऱ्या स्वयंसेवी जथ्थ्यांना जरूर ती सर्व माहिती अशा केंद्रातून मिळते. संगणक महाजालावर 'सहाय्यता स्थळ' (रिलीफ वेब) म्हणून संकेत स्थळ आहे. आपत्तीग्रस्त भागाचे नकाशे, अहवाल, आंतरराष्ट्रीय संघटनांनी केलेली माहिती पत्रके व मदतीची आवाहने यांची एकत्रित संचयिका या स्थळावर उपलब्ध होते. तसेच आपत्तीचा इषारा देणारे 'ह्युमॅनिटेरियन अर्लीवॉर्निंग सिस्टीम' नावाचे देखील एक संकेत स्थळ आहे. त्यात येणाऱ्या आपत्तींची माहिती घटके-घटकेला अद्ययावत् करून दिली जाते. सारांश नवीन तंत्रज्ञान, आधुनिक माहिती साधने, दळण-वळणाची सोय यामुळे गेल्या दीडशे वर्षात आपत्ति-निवारण कामाचे स्वरूप कुठच्या कुठे बदलून गेले आहे.

(१)

तंत्रज्ञानाच्या उपयोगाचे उत्कृष्ट उदाहरण 'त्सुनामी' ही आपत्ती दक्षिण आशियाई प्रदेशावर डिसेंबर २००४ मध्ये कोसळली, तेव्हा पाहायला मिळाले. या आपत्तीत १२ देशातील अडीच लाख लोक प्राणाला मुकले. इंडोनेशिया देशातील 'आसेह' नावाच्या बेटाला त्सुनामीचा मोठा फटका बसला होता. त्सुनामीचा फटका बसला त्याच्या आधी आसेहमध्ये इंडोनेशियाच्या सरकारविरुद्ध बंड चालले होते व इंडोनेशियाच्या फौजा आणि बंडखोर यांच्या लढाया होत होत्या. यामुळे उपग्रहावरून आसेह बेटाची जी चित्रे मिळत होती ती इंडोनेशियाच्या सरकारने प्रसिद्ध होऊ दिली नाहीत. परिणाम असा झाला की, मदत करणाऱ्या स्वयंसेवकांना आपत्तिग्रस्त लोक कुठे आसरा घेऊन आहेत हे पहिले काही दिवस कळलेच नाही. इंडोनेशियाच्या सरकारने पहिले दोन दिवस परदेशी स्वयंसेवकांना बेटावर जाण्याला परवानगी देखील दिली नाही.

या सर्व अडचणींमुळे आसेह बेटावरील मदत कार्याला गोंधळाचे स्वरूप आले होते. एखाद्या ठिकाणी नको इतक्या संख्येने स्वयंसेवक पोचले होते तर दुसऱ्या ठिकाणी गरज असूनही स्वयंसेवक पोचू शकले नव्हते. परंतु महिन्याभरात मदतीची उत्तम व्यवस्था लागली आणि आंतरराष्ट्रीय सहाय्यता केंद्राचे (आय्.आर्.सी.) आरोग्याची काळजी घेणारे पथक तेथे पोचले. त्यांना भौमायो कडून अद्ययावत् माहिती देणारे नकाशे मिळाले होते. नकाशावर निर्वासित, जखमी, मृत आणि गायब माणसांची आकडेवारी दिलेली होती; कोणते मदत-पथक कोणत्या भागात काम करीत आहे हे दाखवले होते; रुग्णालये, आरोग्यकेंद्रे, औषधांची दुकाने यांची माहिती होती. तसेच कोणत्या ठिकाणी कोणत्या रोगाची लागण होण्याची शक्यता आहे, ते दिलेले होते. आरोग्य-पथकाला या माहितीचा अतोनात उपयोग झाला. त्सुनामीनंतर कांजिण्यांची साथ मुलांत पसरण्याचा फार धोका होता. त्यामुळे मुलांना लस टोचण्याचे काम मुख्यत्वाने आरोग्य पथकाकडे आले होते. भौमायोच्या माहितीपूर्ण नकाशांचा उपयोग अन्नपाणी पुरविणाऱ्या, स्वच्छतेची काळजी घेणाऱ्या, निर्वासितांची राहण्याची व्यवस्था करणाऱ्या पथकांनाही मोठ्या प्रमाणात झाला.

साथीचे रोग हे आपत्तिग्रस्त समूहांमध्ये मृत्यूला मोठ्या प्रमाणात कारणीभूत होतात. कांजिण्या हा रोग आपल्याला किरकोळ वाटतो आणि साधारण परिस्थितीत कांजिण्यांमुळे मुले दगावल्याचे ऐकिवात येत नाही. पण आपत्तिग्रस्त स्थितीत, मुळातच आरोग्य व सुदृढता यांचा अभाव असल्याने, कांजिण्यांमुळे देखील मुले मरतात. १९८५ साली सुदानमध्ये दुष्काळ पडला होता. तेव्हा निर्वासितांच्या एका वस्तीत चार महिन्यात दोन हजार मुले कांजिण्यांनी मेली. या अनुभवामुळे आंतर-राष्ट्रीय आपत्कालीन सहाय्य संस्थांनी प्रत्येक आपत्तीनंतर ताबडतोब साथींच्या फैलावाचा अंदाज घ्यायचा, असे ठरविले.

कोणत्या साथीच्या रोगाची कुठे लागण झाली आहे, हे कळण्यासाठी पूर्वी घरोघरी जाऊन माहिती गोळा करावी लागे. आपत्तिग्रस्त प्रदेशात अशी पाहणी करणे अतिशय वेळखाऊ काम असे. पण आता संख्याशास्त्राने सर्वेक्षणाच्या अधिक कार्यक्षम पद्धती शोधून काढल्या आहेत. त्यामुळे थोडक्याच काळात कोणता रोग कोठे पसरत आहे, याची निश्चिती होते. 'डॉक्टर्स विदाउट

बॉर्डर्स' नावाची एक आंतरराष्ट्रीय संघटना आहे. तिने साथीच्या रोगावर कोणते उपचार करावेत हे सांगणारी पुस्तिका, निरनिराळी जरूरीची औषधे, वैद्यकीय उपकरणे अशा साधनांनी भरलेल्या लहान पेट्या तयार केल्या आहेत. या उपक्रमाला जागतिक आरोग्य संघटनेने मोठी मदत केली. ह्या पेट्यातही उत्तरोत्तर सुधारणा होत गेली. आता या आरोग्य-पेटीत निरनिराळ्या रोगांची सुलभ रीतीने चाचणी घेता येईल, अतिसाराने पछाडलेल्या रोग्याच्या शरीरातील पाण्याचे प्रमाण सहजपणे योग्य पातळीवर राखता येईल अशा प्रकारची साधने ठेवली आहेत.

(२)

मानवनिर्मित आपत्तींत नैसर्गिक आपत्तीत होते त्याप्रमाणे जीवित व वित्त यांची हानी होतेच पण त्याहून वाईट म्हणजे बलात्कार, क्रौर्य, अपमान आणि मानवी हक्कांची पायमल्ली असे पैलूदेखील मानवनिर्मित आपत्तीला असतात. नवीन तांत्रिक साधनांमुळे अशा बाबतीत सहाय्य करण्याच्या पद्धतीत सौकर्य निर्माण झाले आहे. गुन्हा-अन्वेषणाची नवी तंत्रे वापरून या आपत्तींचे कर्ते कोण हे निर्विवादपणे सिद्ध करता येऊ लागले आहे.

१९९० च्या दशकात बोस्निया - हर्झेगोव्हिना या प्रदेशात फार मोठे यादवी युद्ध झाले. अमेरिकेच्या लष्करी उपग्रहांनी आणि विमानांनी घेतलेल्या छायाचित्रांवरून असे निष्पन्न झाले की, शेकडो प्रेते एकेका खड्डयांतून पुरली आहेत अशी सामुहिक दफनस्थानेही मोठ्या संख्येने आहेत. ही चित्रे प्रसारमाध्यमांनी प्रसृत केली. त्या प्रदेशात तेव्हा आंतरराष्ट्रीय शांतता पथके तैनात केली होती. तरी हत्या काही थांबल्या नाहीत. परंतु हत्या जेथे होत होत्या ती ठिकाणे या छायाचित्रांमुळे नक्की करता आली. हरवलेल्यांचा शोध घेण्यासाठी एक आंतरराष्ट्रीय आयोग स्थापन करण्यात आला. या आयोगातील शास्त्रज्ञांनी या मृतांचे डीएन्‌ए नमुने गोळा केले व ते नमुने आणि जिवंत माणसांच्या डीएनएचे नमुने यांची जुळणी (मॅचिंग) करणारा एक संगणकीय कार्यक्रम तयार केला. त्यावरून या बळींपैकी बारा हजार बळींचा पत्ता लावता आला.

ह्या शोधावरून हे स्पष्ट झाले की, एका विशिष्ट समाजातील मनुष्यांना लक्ष्य ठरवून त्यांचा काटा काढण्यात आला होता. बोस्नियातील सर्व जमातींचे राज्यकर्ते वर्षानुवर्षे आग्रहपूर्वक सांगत होते की आमचे सैन्य बोस्नियातील मुसलमानांना वेचून मारते, हा आरोप खोटा आहे. परंतु, डीएन्‌ए पडताळण्याच्या या सबळ पुराव्यामुळे राज्यकर्त्यांना मान्य करावे लागले की, त्यांच्या सैन्याने स्रब्रेनिका नावाच्या गावात मुसलमानांची कत्तल केली होती.

भौमायो आणि डीएन्‌ए चाचण्या यांच्यामुळे निर्वासित आणि जखमी किंवा मृत यांचा थांगपत्ता लावणे, त्यांची ओळखपत्रे तयार करणे, त्यांच्या नातेवाइकांना माहिती देणे या गोष्टी सोप्या झाल्या आहेत. हिंदुस्थानाची फाळणी झाली तेव्हा केवढ्या मोठ्या प्रमाणात अत्याचार झाले, किती स्त्रिया पळविल्या गेल्या, किती मुले हरवली यांचा नेमका अंदाज अजूनही देता येत नाही. जी काही माहिती मिळते ती त्या कहरातून वाचलेल्या माणसांनी ज्या हकीकती सांगितल्या त्यावरून. परंतु आता संख्याशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ यांनी सर्वेक्षणाची जी नवी तंत्रे बसविली आहेत त्यांच्या सहाय्याने अशा ज्या सुलतानी आपत्ती येतात त्यात बळी गेलेल्यांची बरीच खात्रीलायक माहिती लवकर जमा करता येते.

१९९९ साली युगोस्लाव्हियाच्या कोसोव्हो या प्रांतातून तेथे घुसखोरी करून राहिलेल्या अल्बानियाच्या लोकांना घालवून देशासाठी सर्ब या राज्यकर्त्या जमातीच्या फौजांनी कारवाई केली. हिंदुस्थानच्या फाळणीच्या काळात निर्माण झालेल्या परिस्थितीसारखीच दुर्दशा तेव्हा तेथे झाली होती. ट्रक्स, मोटारी, घोडागाड्या किंवा दुसऱ्या निर्वासितांच्या खांद्यावर बसून हजारो स्त्री-पुरुष व मुले कोसोव्हो मधून निघून मॅसेडोनिया या ग्रीसच्या प्रांताकडे चालले होते. या निर्वासितांची नोंद ठेवणे, त्यांची देखभाल करणे, आजाऱ्यांना व जखमींना औषधे पुरविणे या कामासाठी संयुक्त राष्ट्रसंघाचे पथक आले होते; पण हे काम त्यांच्या अवाक्याच्या बाहेरचे होते. कुटुंबे बारा वाटा फुटली होती. नवऱ्याला बायकोचा पत्ता नव्हता, मुले आई--बापांपासून हरवली होती. निर्वासितांसाठी जी शिबिरे थाटली होती तिथे हलकल्लोळ माजला होता.

अशा वेळी 'मायक्रोसॉफ्ट' या विख्यात संगणक-उद्योगाने संयुक्त राष्ट्रांच्या निर्वासित सहाय्य केंद्राला मदत करण्याचे ठरविले. काहीच दिवसात 'मायक्रोसॉफ्ट'चे लोक निर्वासित शिबिरात आले. त्यांनी निर्वासितांची छायाचित्रे घेतली व प्रत्येकाला संगणकाच्या

सहाय्याने तयार केलेले ओळखपत्र दिले. त्यातून जी माहिती जमा झाली तिच्या सहाय्याने निर्वासित कुटुंबांच्या घटकांची परस्परांशी गाठ घालून देणे सोपे झाले.

याच आपत्तीच्या काळात 'फिजिशियन्स फॉर ह्यूमन राईट्स्' या संघटनेने अल्बानियन निर्वासितांचे नवीन संख्याशास्त्रीय तंत्रांच्या सहाय्याने सर्वेक्षण करून या निर्वासितांच्या मानवी हक्कांची कोणत्या प्रकारांनी पायमल्ली झाली आहे याचा अहवाल तयार केला. त्यातून असे लक्षात आले की, सार्बियन लष्कर व पोलीस यांच्या अत्याचारांमुळे अल्बानियन लोकांनी घरे-दारे सोडून पळ काढला होता आणि त्यांच्यावर मोठ्या प्रमाणात अत्याचार झाले होते. या अहवालातील पुराव्यांमुळे युगोस्लाव्हियाचे तेव्हाचे राष्ट्राध्यक्ष स्लोबोदात मिलोसेव्हिच् यांच्यांवर युद्धाचे गुन्हेगार म्हणून खटला भरण्यात आला.

(३)

नवीन तंत्रज्ञानाने आपत्कालीन सहाय्यता मोहिमा आता अधिक कार्यक्षम पद्धतीने चालविता येतात हे खरेच आहे. परंतु त्यात अनेक खेंकटी उद्भवतात. निरनिराळ्या संघटना सहाय्य देण्याचे काम करतात. त्यांच्यात ताळमेळ नसतो. माहिती गोळा करण्याची कोष्टके सर्व संघटनांची एकच असायला हवीत. तशी ती असत नाहीत. तंत्रज्ञानाने उपलब्ध करून दिलेली उपकरणे आपत्कालीन स्थितीत पूर्ण कार्यक्षमतेने काम करतातच असे नाही. संगणक बंद पडतो; संचार यंत्रणा थांबते; औषधे संपतात. बरे, जी उपकरणे, औषधे किंवा यंत्रे तयार केलेली असतात ती आपत्कालीन परिस्थिती लक्षात घेऊन केलेली नसतात. उदा. पाणी स्वच्छ करण्याच्या जाळ्या. या जाळ्या मोठ्या शहरातील मुळातच पुरेसे स्वच्छ असलेले पाणी स्वच्छ करण्यास उपयोगी असतात; पण पुराचे पाणी पिण्याला योग्य करण्यासाठी उपयोगी नसतात. पुष्कळदा असेही होते की, आपत्कालीन मदत खऱ्याखुऱ्या संकटग्रस्तांपर्यंत न पोचता ती त्यामानाने सुस्थितीतील लोकांपर्यंतच पोचते. उदा. त्सुनामीच्या संकटात मदत-जथ्थ्यांनी थायलंडमधील संकटग्रस्तांचे सर्वेक्षण करायला सुरुवात केली, तीच मुळी 'फुकेट' या प्रवासी-स्थळापासून. साहजिकच असे आढळून आले की, आपद्ग्रस्तात थाई लोकांपेक्षा युरोपियन व अमेरिकन लोकच जास्त आहेत!

आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, 'आपत्कालीन मदत' ही तात्कालिक सारवा-सारव आहे. तिला काही संकटापासून बचाव करणारी यंत्रणा किंवा संकटावर मात करणारी यंत्रणा यांचा दर्जा मिळू शकत नाही. ही मदत कितीही ठोस आणि शास्त्रीय पद्धतीने केलेली असली तरी अशी कदत करण्याची जरूर पडावी यातच कोठे तरी, काही तरी चुकले आहे याचा इशारा आहे. मनुष्य-निर्मित आपत्तींच्या बाबतीत तर काही तरी चुकलेले असते, हे स्पष्टच असते. पण नैसर्गिक आपत्तींच्या वेळीही जेव्हा अशा मदतीची गरज पडते तेव्हा आपण असे म्हणू शकतो की, तेथील समाजाने अशा आपत्तीपासून स्वतःला वाचविण्यासाठी पुरेशी तयारी केलेली नव्हती; आणि त्या आपत्तीचा इशारा आपल्याला अगोदर मिळेल अशी यंत्रणा उभारली नव्हती. मनुष्य-जातीने अशा तऱ्हेच्या आपत्तींना तोंड देण्याची आपली क्षमता व आपला निश्चय नीट जोपासला पाहिजे. त्यासाठी कशा प्रकारची राजकीय पावले उचलावीत, पायाभूत सुविधांत कोणते बदल करावेत आणि इतर काय काळजी घ्यावी याचा सतत विचार झाला पाहिजे.

भविष्यकाळात आपत्कालीन मदतीची अधिकाधिक व वारंवार गरज पडेल, असे दिसते. विकसनशील जमातीतील शंभर कोटी लोक झोपडपट्ट्यातून राहतात. ह्यातल्या पुष्कळ झोपडपट्ट्या आपत्तीप्रवण क्षेत्रात आहेत. वाढती जागतिक उष्णता व त्यामुळे समुद्राची वाढणारी पातळी यामुळेही भविष्यात मोठ्या आपत्ती येतील. विज्ञान व तंत्रज्ञान यांच्या विकासातून अशा आपत्तींना तोंड देण्याची साधने आपल्याला मिळतील यात शंका नाही. त्यामुळे अनेकांचे जीव वाचवता येतील, दुःखे व वेदना कमी करता येतील, रोगांची लागण थांबावता येईल. आंतरराष्ट्रीय संस्था, सरकारे, लष्कर, खाजगी उद्योग असे सगळे संकटांना सामना करण्यासाठी मदत करायला तयार असतीलच. पण जरूर कशाची आहे तर, घातक हितसंबंधांना बाजूला सारून आपत्तिप्रवण भागाची शास्त्रीय माहिती गोळा करण्याची आणि तिचा उपयोग करून योग्य ठिकाणी अगदी कमी वेळात व परम कार्यक्षमतेने मदत पोचेल याची तरतूद करण्याची.

(आधारित:)

# प्रतिक्रिया आणि पत्रव्यवहार

## रीले जिंकण्याची संधी

अ० वि० सहस्रबुद्धे

'नवभारत' मे–जून–जुलै २००७ च्या अंकातील स्त्री व पुरुषी वर्चस्व या संबंधातील लेख वाचला.

स्त्रियांना आजवर दुय्यम स्थान मिळाले आहे. भारतातच नाही तर अन्य अनेक देशातून हीच परिस्थिती असली तरी भारतात मात्र स्त्री वर्गाची गळचेपी झाली, छळ झाले. स्त्रियांना कायमच पुरुष वर्गाच्या दासीचे स्थान मिळत गेले. नटण्यामुरडण्याचे स्वातंत्र्य नाही. मनातले विचार मोकळेपणाने मांडण्याचे स्वातंत्र्य नाही. नवीन संशोधने, नवे विचार, नव्या योजना या गोष्टी दूरच. कायम चूल, मूल व घरकाम या सीमारेषेबाहेर येता आले नाही. एवढेच काय केशवपन, सती जाणे अशा भयानक छळाला तोंड द्यावे लागले.

स्त्री वर्गाला त्रास झाला खरा पण याला तोडगा काय? बोटे मोडत बसणे? पुरुषांना दोष देत राहणे? पण यातून स्त्रियांना पुढे जाता येईल? त्यापेक्षा अशी स्थिती का आली व त्यावर तोडगे काय यांचा विचार करून पुढच्या दृष्टीने योग्य दिशा ठरवून भक्कमपणे मार्गक्रमण करणे योग्य ठरेल. स्त्रियांना दुय्यम स्थान का मिळाले; यावर पुढीलप्रमाणे विचार मांडले आहेत.

पहिले कारण म्हणजे स्त्री ही पुरुषांच्या मानाने शरीरिक दृष्ट्या व ताकतीमध्ये कमी पडते. 'बळी तो कान पिळी' हेच सूत्र आजवर होते. आजवर राज्ये जिंकणे — अधिपत्य गाजविणे या गोष्टी शक्तीच्या जोरावरच चालत. घरात भावंडांमध्ये, गल्लीत खेळणाऱ्या मुलांमध्ये देखील मोठी मुले 'दादागिरी'ने वागतात. स्त्रीला शक्तीमध्ये निसर्गाने जरा दुय्यम स्थान दिले त्याचा फायदा पुरुष वर्गाने घेतला.

फार पूर्वी आदिमानवाच्या काळात शिकार व संरक्षण या अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी होत्या. अशा गोष्टी स्त्रीपेक्षा पुरुषांनी करणे सोपे व योग्य ठरे. बाईच्या मागे मुलाना जन्म देणे म्हणजे गरोदरपण वगैरे, व मुलांचे संगोपन या गोष्टी निसर्गतःच मिळाल्या त्यामुळे पुरुषांच्या छायेत राहून या गोष्टी सांभाळणे हे स्त्रीलाही योग्य वाटे. पुरुषांचा तर आक्रमण, झगडा, लढाई हा पिंड असल्याने संरक्षण व शिकार या जबाबदाऱ्या आल्या. 'स्त्री'ने मात्र पुरुषांना त्यासाठी स्वतःहून मोठेपण देऊन त्यांच्या सावलीत स्वतःच्या निसर्गाने टाकलेल्या जबाबदाऱ्या स्वीकारल्या.

त्यानंतरच्या काळात आक्रमणे व लढाया होत गेल्या. या वेळीही स्त्रीने घर व मुले सांभाळणे या गोष्टीच स्वीकारल्या. समजा आज जरी मारामारी किंवा लढाई झालीच तर बाई म्हणेल, 'तुम्ही पुरुषच व्हा पुढे लढाईला, मी आपली घर वगैरे सांभाळेन!'

आता लढाया थांबल्या. पण पुरुषांची मोठेपणाची मक्तेदारी राहिलीच आहे. निवडणुकीतसुद्धा स्त्रियांसाठी राखीव मतदारसंघात स्त्री उमेदवार उभी असली तरी खरा सूत्रधार म्हणजे तिचा पतीच असतो व त्या तालावर स्त्री 'कारभार' सांभाळते. अपवाद वगळल्यास अनेक ठिकाणी अशी परिस्थिती दिसते.

वरील सर्व गोष्टी जरी मान्य झाल्या तरी भारतात मात्र स्त्री वर्गाचा आत्यंतिक छळ झाला, केशवपन करून विद्रूप करणे व सती देऊन स्त्रीला जाळून मारणे हे प्रकार भयानक, चीड आणणारे व लांछनास्पद होते. या अमानुष प्रथा कशा काय आल्या? भारतीय संस्कृतीला दोष द्यायचा म्हटले तर तसे प्रकार पुराण संस्कृतीत किंवा शिकवणीत नसावेत. 'दक्षकन्या सती' वगैरे कथा असल्या तरी त्या 'सती'ने नवऱ्याचा अपमान झाला म्हणून जाळून घेतले. अगदी शिवाजीच्या काळापर्यंत सती किंवा केशवपन या चाली नसाव्यात. मग त्या प्रथा का व कशा आल्या?

भारताने गेल्या दोन–अडीच हजार वर्षात आक्रमण केले नाही पण भारतावर मात्र अनेक आक्रमणे झाली. त्यात बहुतेक वेळा आपला पराभव झाला हे दिसतेच कारण डच पोर्तुगीज इंग्रज, मोगल यांनी आपल्यावर राज्य केले त्या अर्थी ते लढाया जिंकले.

आपला पराभव होत गेला त्या वेळी आपले अनेक लोक मारले गेले असणारच. कांही वेळा दहा हजार, कांही वेळा पन्नास हजार लोक मारले गेले. हे मारले गेलेले लोक सर्व पुरुष व त्यातही जवान लोक होते, आता या मारल्या गेलेल्या पुरुषांच्या बायकांचे काय? बहुतेकांना तरुणपणीच वैधव्य आले. कारण मेलेल्या सैनिकांमध्ये तरुण असले पाहिजेत व त्यांच्या पत्नींना तरूणपणीच वैधव्य आले. या तरूण विधवांवर जिंकलेल्या शत्रूंची वाईट नजर पडणे फारसे अस्वाभाविक नाही. तेव्हा या तरूण विधवांची एक समस्याच निर्माण झाली असावी. मग कुण्या "अतीशहाण्या" मंडळींनी केशवपन करून विधवांना विद्रूप करणे किंवा 'सती' देऊन मारून टाकणे असे भयानक तोडगे काढले असावेत. या गोष्टींना पुरावे देणे शक्य नाही, कारण तशी लिखापट्टी किंवा पुरावे कोण ठेवणार?

विधवांची "वासलात" लावली गेली. पण अविवाहित मुलींची समस्या 'जिवंत' राहिली. कारण तरूण मुलगे लढाईत प्रचंड प्रमाणात मारले गेल्याने मुलींना वर मिळणे दुरापास्त झाले. मोठ्या प्रमाणावर अविवाहित मुली मागे राहिल्या. मग मुलांचा भाव वधारला. अमुक एक रक्कम मिळाल्याशिवाय मुलगी पदरात घेणार नाही असा वर पित्यांचा ताठा सुरू झाला. पुढे हीच पद्धत 'हुंडा' रूपाने सुरू झाली. भारतीय संस्कृतीत 'स्वयंवर' पद्धत होती पण काळाने पलटी मारली, विनवण्या करून हुंडा देऊन मुलगी 'कटविण्याची' पद्धत सुरू झाली. कांही पित्याना आपली मुलगी विवाहित पुरुषाला देणे भाग पडे कारण हुंडा देण्याची ऐपत नसावी. कांही वधूपिते आपल्या तान्ह्या मुलीसाठी मुलगा "बुक" किंवा 'रिझर्व्ह' करून ठेऊ लागले. त्यातून तान्ह्या मुलामुलींची लग्ने लावायची व बालविवाहाची पद्धत रुढ झाली. त्यानंतर मुलगी जन्मली की लोकांना ती 'ओझे' वाटू लागली. आज देखील मुलगा झाला की "व्वा! नशीबवान आहात!" असे उद्गार ऐकायला मिळतात. मुलगी झाली तर मात्र "काही हरकत नाही. पुढच्या वेळेला होईल मुलगा!" असा दिलासा दिला जातो. मुलगा झाल्यावर मात्र — 'पुढच्या वेळेला होईल मुलगी' असा दिलासा अजिबात ऐकायला मिळत नाही आता तर गर्भजल परिक्षा करून मुलगी असेल तर 'पाडून टाकणारे' अनेक आहेत. या बेकायदेशीर प्रकाराला 'मॅनेज' ही केले जाते. त्यासाठी कांही हजार मोजायला (कदाचित हुंड्याच्या 'रेट'च्या आसपासची रक्कम) लोक तयार असतात!

ही सर्व स्त्रीच्या बाबतीतली दुर्दैवी, निराशाजनक बाजू पाहिली तरी आता काळाने 'पलटी' मारलेली आहे. परिस्थिती स्त्रीशक्तीला वाव मिळण्यासारखी आहे. आजपर्यंत स्त्री जातीने भोग भोगले पण त्या सर्वांची भरपाई होण्यासारखी परिस्थिती निर्माण झाली आहे. आजपर्यंत स्त्री ही कुटुंबाशी प्रामाणिक राहिली, विरुद्ध परिस्थितीतही स्त्रिया खचल्या नाहीत की, त्या पुरुषाप्रमाणे व्यसनाधीन वगैरे झाल्या नाहीत. शारीरिक दृष्ट्या स्त्री जात कमी पडत असली तरी आता टक्के टोणपे खाऊन मनाने अतिशय कणखर व खंबीर झाली आहे. स्त्री जात सौंदर्याला महत्त्व देते पण जीवनात तरतरीतपणा, उमेद राहाण्यासाठी सौंदर्यदृष्टी गरजेची आहे आणि स्त्रियांचा एक साधा सरळ 'फॉर्म्युला' असा आहे की, जी गोष्ट सुंदर टवटवीत दिसते ती स्वभावतः गुणधर्माने चांगली असते, बाजारात भाजी घेताना आपण रसरशीत दिसणारी भाजी घेतो कारण ती चांगली असते. समजा दोन जुळे भाऊ आहेत. एक व्यसनाधीन वगैरे झाला व पुढे रोगट झाला — दुसरा निर्व्यसनी चांगल्या वळणाचा, आरोग्य संपादन करणारा असला तर त्यातील सुंदर किंवा रुबाबदार कोण दिसेल? अर्थात दुसरा सुंदर. त्यातील रुबाबदार दिसणाऱ्याला मुलीने पसंती दिली तर ती योग्यच ठरते कारण त्याची पूर्वठिकाणी निश्चित चांगली असणारच!

मी एक स्त्रियांनी चालविलेले व्हील बॅलन्सिंगचे वर्कशॉप पाहिले. तिथे डायरेक्टर, मॅनेजर, सुपरवायझर्स, कामगार सर्व स्त्रियाच होत्या. कांही पुरुष हेल्पर म्हणून होते. (हे कल्पनेतले उदाहरण नाही. पुण्याजवळ पिंपरी येथे अजूनही आहे.) वर्कशॉप स्वच्छ ठेवले होते. सर्व कामगार (स्त्रिया) टेबलावर काम करीत होत्या. मला एका व्हीलचे बॅलन्सिंग करून घ्यायचे होते. मॅनेजर बाईने 'अमूक तारखेला अमूक वाजता जॉब तयार होईल, बिल ..........रू. होईल. बिल दिल्याशिवाय जॉब मिळणार नाही.' असे सांगितले. मी ठरल्यावेळी पेमेंट घेऊन गेलो. जॉब तयार करून व्यवस्थित तयार होता. मी जॉब चेक केला तर तो परफेक्ट होता.

तिथला प्रकार बघून मी चकित झालो. या








बायाना चूल, मूल, घर यातून बाहेर पडायला लागून ५० वर्षे सुद्धा झाली नाहीत त्यांची एवढी आघाडी? खरे तर आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. आज काल स्त्रिया वाहने चालवितात, विमान चालवतात, त्या डॉक्टर – इंजिनियर्स आहेत, कलेक्टर आहेत, कंडक्टर आहेत, पेट्रोल पंपावरील कर्मचारी आहेत. हल्ली तर कारखानदार पुरुष कामगारांपेक्षा स्त्री कामगार मशीनवर काम करण्यासाठी पसंत करतात. कारण त्यांची सचोटी, नीटनेटकेपणा, सिन्सिरिटी व मनापासून काम करण्याचा स्वभाव! पुरुष कामगारांसारखी टाळाटाळ नाही, चहा – तंबाखूसाठी वेळ काढूपणा नाही, दारू पिऊन मारलेल्या दांड्या नाहीत. लहान मोठ्या पदांची ठीक आहे. पण भारताचे पंतप्रधान पद सांभाळणाऱ्या इंदिरा गांधींचे उदाहरण फार मोठे आहे. आजवरच्या पंतप्रधानांच्या कारकिर्दीत त्यांची कारकीर्द अत्युच्च आहे. 'टाईम्स ऑफ इंडिया' या वृत्तपत्रात एक व्यंगचित्र प्रसिद्ध झाले होते त्यात लोकसभेतील पुरुष सदस्य व मंत्रीगण साड्या कुंकू लावून बसले होते. इंदिराजी मात्र मिशा वगैरेसह रूबाबात मर्दानी थाटात उभ्या होत्या. चित्राखाली ओळ होती, 'Only He-Man in the Parliament!' (लोकसभेतील एकमेव मर्द!)

भारतात गेल्या ५० वर्षात स्त्रियांनी घेतलेली भरारी पाहता स्त्रीची पात्रता किती मोठी आहे हे स्पष्ट दिसते. मग आता 'रीले' जिंकायला काय अवकाश? आणि आता तर परिस्थिती एकदमच अनुकूल आहे. कशी ते पाहू!

स्त्री शारीरिक दृष्ट्या कमी असली तरी हल्लीच्या काळात शक्तीची जरूरीच नाही. सर्व कामे यंत्राद्वारे होत असल्याने शक्तीपेक्षा बटणे दाबण्याचे कौशल्य जरूरीचे आहे व ते स्त्रियांच्यात आहे. हल्ली लढाया कमी झाल्या आहेत. पूर्वीसारख्या वारंवार होणाऱ्या लढाया नाहीत. आणि लढाई झालीच तर तलवारबाजीसाठी लागणारी मनगटातील ताकत जरूरीची नाही. नेम धरून बंदुकीचा चाप ओढला तर त्याला शक्तीची गरज नाही. कुठलीही स्त्री योग्य शिक्षण दिले तर बंदूक चालवू शकते.

आता स्त्रियांची पुरुषांच्या प्रमाणात संख्या घटत आहे ही समाजाच्या दृष्टीने चिंतेची बाब असली तरी स्त्रियांना त्या बाबतीत चिंता करण्याचे मुळीच कारण नाही. १००० पुरुषांच्या प्रमाणात ९२० ते ९३० स्त्रिया आहेत. मुलांचे व मुलींचे अनुक्रमे प्रमाण तसेच आहे असे धरल्यास १०० मुलांमध्ये ९२ मुली म्हणजे ९२ टक्के प्रमाण आहे. म्हणजे सर्वच्या सर्व मुलींना जोडीदार मिळूनसुद्धा ८ मुलग्यांवर अविवाहित राहाण्याची वेळ आली आहे. त्यानुसार नकट्या, अशिक्षित, काळ्या-सावळ्या सर्वच्या सर्व मुलींना निश्चितपणे नवरा मिळून सुद्धा ८ मुले शिलकीत राहाणार आहेत. याचाच अर्थ आता 'चॉईस' मुलींच्या हातात आहे. योग्य असे शिक्षित, निर्व्यसनी, निरोगी मुलगेच निवडता येतील. तशी पात्रता येण्यासाठी आता मुलांना स्पर्धेत उतरण्याची गरज आहे. त्यांना गुणवत्ता वाढवावीच लागेल अन्यथा अविवाहित राहावे लागेल. पुणे 'सकाळ' ८/५/०७ च्या अंकात एक बातमी होती, 'कुणा एका गावात मुलांना मुली मिळणे अवघड झाले आहे. बत्तीस वय उलटले तरी मुलांना मुली मिळत नाहीत. मुलांचे लग्न होईल की नाही हे विचारायला पालक जन्मपत्रिका घेऊन पुरोहिताकडे जातात. पूर्वी ही परिस्थिती उलटी होती ........' वगैरे. एकूण काय! निवड मुलींच्या हातात! या स्पर्धेतून मुलांना गुणवत्ता वाढवावी लागल्याने संपूर्ण समाजाचीच गुणवत्ता वाढत जाणार आहे.

आता लग्नासाठी मुलींकडून हुंडा द्यावा लागणारच नाही! उलट मुलांनाच धनराशी घेऊन मुलींच्या दारात जावे लागेल!!

✠✠✠

## भारत-नेपाळ संबंधाविषयी...

श्री० विश्वनाथ खैरे

नवभारत ऑक्टोबर २००७ अंकात पृ. १७ वर 'भारत-नेपाळ संबंध' विषयक लेखात (ले. विश्वास दांडेकर) रस्तेबांधणीबाबत जाग यायला भारताला फार काळ लागला अशा आशयाचे विधान आहे.

याच अंकात पृ. ११ वर १९५२ साली नेपाळचे राजे त्रिभुवन भारतात आश्रयाला आले त्यांची भारताने राजपदावर पुनः स्थापना केली याचा उल्लेख आहे. साल वगळता तो दांडेकरांच्या लेखात पृ. १६ वरही आला आहे. त्या काळातल्या सलोख्याच्या वातावरणात बिहारातील रक्षौलवरून काठमांडूपर्यंतचा 'त्रिभुवन राजपथ' हा

नेपाळातला पहिला महामार्ग भारतीय सेनेच्या इंजिनीयरांनी बांधून दिला. १९५५ मध्ये राजे महेंद्र गादीवर आल्यानंतर नेपाळ–भारत–अमेरिका यांचे संयुक्त मंडळ रस्तेबांधणी-साठी अस्तित्वात आले. त्याने रस्त्यांची काही कामे सुरू केली पण ते पुढे बरखास्त झाले. १९६४ साली 'भारतीय सहायता मिशन' मार्फत 'केन्द्रीय लोकनिर्माण विभागा'ने गोरखपूरच्या उत्तरेस नेपाळ सीमेपासून पोखरा पर्यंत १८० कि. मी. लांबीचा 'सिद्धार्थ राजमार्ग' बांधण्यास सुरुवात केली. तो १९६९ मध्ये पुरा झाला. (त्याआधी चीनने तिबेटसीमेवरील कोदारी पासून काठमांडूपर्यंतचा रस्ता बांधून दिला होता आणि पोखरा–काठमांडू रस्त्याचा आरंभ केला होता. हे राजे महेंद्र यांच्या 'स्वतंत्र' धोरणामुळे झाले होते. उत्तर–दक्षिण सिद्धार्थ राजमार्गाप्रमाणेच पूर्वपश्चिम महेन्द्र राजमार्ग हा तराईतला २५० कि. मी. लांबीचा महामार्गही १९६८ पासूनच केन्द्रीय लोकनिर्माण विभागाने बांधून दिला. यावरून 'रस्ते बांधणीबाबत भारताला उशिरा जाग आली' असे म्हणता येणार नाही असे वाटते. प्रस्तुत लेखकाने १९६५–६९ या काळात या दोन्ही महामार्गांवर अधीक्षक इंजिनीयर पदावर काम केले होते आणि त्या काळात भारत – नेपाळ संबंध पूर्ण मित्रत्वाचे होते.

विश्वनाथ खैरे.
३७४, सिंध सोसायटी,
पुणे ४११ ००७.

✠✠✠

## लेखकांचा परिचय

❑ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभाग प्रमुख, गणित विभाग, नौरोजी कॉलेज, पुणे; आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच्.डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षक चळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान विषयावर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.

*पत्ता* :- ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४.

❑ **प्रा० सोपान शेंडे**

अधिव्याख्याता इतिहास विभाग, स.प. महाविद्यालय, पुणे ४११ ०३०.




❑ **डॉ. अशोक पांडुरंग दाणी**

माजी प्राचार्य, फर्ग्युसन कॉलेज, पुणे, इंग्रजीचे सेवानिवृत्त प्राध्यापक.

*पत्ता* :- प्लॉट क्र. १४, युनायटेड वेस्टर्न सोसायटी, कर्वेनगर, पुणे – ४११ ०५२.

❑ **डॉ. भास्कर व्यं. गिरिधारी**

गोखले एज्युकेशन सोसायटीच्या महाविद्यालयांचे निवृत्त प्राचार्य, सध्या त्याच सोसायटीचे झोनल सेक्रेटरी आणि जॉईंट ट्रेझरर, मराठी विषयाचे अभ्यासक, संशोधक आणि मार्गदर्शक आदिवासी लोक साहित्यावर निबंध.

*पत्ता* :– विभा पर्णश्री सोसायटी, एच्. पी. टी. कॉलेज जवळ, नाशिक ४२२ ००५. फोन – (०२५३) ५६२३४०१.

❑ **डॉ. रविंद्र भास्कर पाटील**

सद्गुरू गाडगे महाराज कॉलेज, कराड येथे मराठी विषयाचे अधिव्याख्याता.

*पत्ता* :- क्र– १ निलमोहर, कृष्णाकाठ पतपेढीजवळ अंजिरा संकुलजवळ, सैदापूर, विद्यानगर, कराड

❑ **डॉ. सु. र. देशपांडे**

मराठी विश्वकोशात पुरातत्त्वविद्या, मानवशास्त्र, राज्यशास्त्र या विषयांचे संपादक, भारतीय शिल्पकला विषयांचे लेखक .

*पत्ता* :- विश्वकोश कॉलनी, वाई जि. सातारा.

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. बा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ४५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




